# संगीत चंद्रग्रहण

हें नाटक

**रा. रा. यशवंत नारायण टिपणीस**

'मत्स्यगंधा,' 'राधामाधव,' 'जरासंध,' 'कमला,' 'शर्मिष्ठा,'
'राज्यारोहण,' 'संगीत 'शहाशिवाजी,' पुण्याचा-
मार्ग,' 'गड कुणाचा,' इत्यादि नाटकांचे
कर्ते, यांनीं लिहिलें.

---



आवृत्ति दुसरी

---


[प्रका]शक—एम्. व्ही. आगाशे बुकसेलर—बुधवार चौक पुणें.

मुद्रक—लक्ष्मण भाऊराव कोकाटे "हनुमान" छापखाना
सदाशिव पेठ, घ. नं. ३००, पुणें.

—:❀:—

सन १९२०.

किंमत १ रुपाया.

# संगीत चंद्रग्रहण.

मंगलाचरण.

पद १ लें. राग हमीर, ताल रूपक.

गा भालचंद्र नरेंद्र नरवर कंठि हर हर गर्जुनी ॥
मालिनासि मस्तकिं मिरवि जो सुविभा स्वयें त्या अर्पुनी ॥ धृ० ॥
ग्रह दानवी उलथोनि रक्षक होई लोकां सुखवुनी ॥
अवतार प्रकटत अवनिवर शिवराज तो शोभे रणीं ॥ १ ॥

## अंक पहिला.



### प्रवेश पहिला.

स्थळ:—जगदेवरावाचा वाडा.

[ चंद्रावती येते. ]

**चंद्रा०** अहाहा ! चांदणं कसं गोड पडलं आहे !

पद २ रें. राग यमन, ताल त्रिवट.

प्रेमें शशिकला अवनिला सुखद सुधा पाजित बाला ।
मृदु मृदु गाल, चुंबुनि भाल, रमवी अंकीं ॥ धृ० ॥
उदित होत धवल सुधांशु लख लख तेज खुलत हें
जगत फुलत ॥ १ ॥

पण हें काय ?—सृष्टीच्या आनंदांत विरजण घालण्याकरितां हा नीच राहू चंद्राला ग्रासून टाकतो आहे. हा पहा अंधार पडत चालला. काय ग बाई तरी! इतका वेळ पौर्णिमेचं चांदणं कसं लख्ख पडलं होतं ! आणि इतक्यांत हा अमावास्येचा काळाकुट्ट अंधार !–पौर्णिमा आणि अमावास्या या बहिणीबहिणी आज एकमेकींना कडकडून भेटत आहेत; का दोघींचा तंटा विकोपाला जाऊन एकमेकींच्या झिंज्या धरून एकमेकींना ओढीत आहेत ?–कांहीं कळत नाहीं !–बाळ विश्वास ! हा चांदोबा पाहिलास का कसा काळवंडत चालला आहे ?

[ विश्वास येतो. ]

**विश्वा०** खरंच आई ! या चांदोबाचा चेहरा असा उतरून ग कां गेला ? मी त्याच्याजवळ रोज टोपी मागतों आणि तो आपला रोज " आज नाहीं बाळ उद्यां ये " असं म्हणून माझी टोलवाटोलवी करतो. " साफ देत नाहीं " असं एकदांच कां नाहीं सांगत ? मला द्यायला त्याच्याजवळ टोपी नाहीं का ?

**चंद्रा०** बाळ ! कसली टोपी अन् कसलं काय ! आज त्याची अगदीं पांचांवर धारण बसली आहे. आजपर्यंत या चांदोबानं कितीक मुलांना तुझ्याप्रमाणेंच ' उद्यां उद्यां ' म्हणून नादीं लावून फसवलं. सगळ्या मुलांनीं देवबाप्पाकडे तक्रार नेली आणि म्हणूनच राहू केतू त्याला पकडून देवबाप्पासमोर नेत आहेत.

**विश्वा०** आणि म्हणूनच तो असा शरमला आहे नाहीं ? अरेच्या ! कसा गुलाम आतां टोपी देत नाहीं पहातों. 'चांदोबा, चांदोबा, टोपी दे. ' म्हण आतां ' देतों ' म्हणून. ' आज नाहीं बाळ उद्यां ये ' असं तोंड वेंगाडून बोलशील तर खबरदार !

**चंद्रा०** बाळ ! संकटांत सांपडलेल्याला असं हिणवूं नये. आपत्ति आली, कीं मनुष्य तर दुबळा होतोच, पण देवांचीसुद्धां दुर्दशा होते. त्यांतून हा चंद्र पहिल्यापासूनच कर्जबाजारी ! सूर्यासारखा मित्र त्याला मिळाला, म्हणून आतांपर्यंत त्याला धनाची मदत होऊन, त्याचा चेहरा उजळ राहिला. पण आज देवानं सूर्याला सांगितलं, कीं हा चांदोबा उसन्या अवसानानं फारच शेखी मिरवतो. खबरदार, त्याला मदत केलीस तर. नाहीं तर तुझाही नक्शा

उतरून टाकीन. सूर्य बिचारा काय करतो ? बसला गप्प. चांदोबाची मात्र अगदीं दीनवाणी स्थिति झाली आहे. बिचाऱ्याचं आज पुरं दिवाळं निघालं.

**विश्वा०** खरंच आई ! त्याची आतां तर अगदीं केविलवाणी मुद्रा झाली आहे. मला नाहीं पहावत ती. चांदोबा ! नको. मला तुझी टोपी नको. मी सगळ्या मुलांना सांगतों, चांदोबाजवळ टोपी मागूं नका म्हणून. मग तर झालं ना ? आतां हांस पाहूं एकदां रोजच्यासारखा.

## पद ३ रें. राग काफी, ताल त्रिवट.

**चल हांस एकदां । हांसरे जरा ॥ धृ० ॥ टाकि लाज**
**सुंदरा । वदन पाहुं दे जरा । गगनीं हांसति या**
**बघ तारा । वीरा ॥ १ ॥**

देवबाप्पा ! सोड-सोड त्या चांदोबाला, आम्हांला चांदोबाच्या टोपीची जरूर नाहीं. विश्वास नामर्द नाहीं; विश्वास स्वतःची टोपी कमवील आणि कितीक मुलांना टोप्या कमवून देईल. आई ! खरंच, या चांदोबाची मला अगदीं दया येते. देवा ! या चांदोबाला सोड ना.

**चंद्रा०** शाबास बाळ ! तूं देवाची विनवणी केलीस, तो आतां मोकळा होईल बरं ! ते बघ गोरगरीब 'दे दान सुटे गिऱ्हान' म्हणून ओरडत आहेत. जा, सुभान्याबरोबर दरवाज्यापाशीं जा आणि टोप्या दान कर म्हणजे हें ग्रहण सुटेल आणि तुझा चांदोबाही तुझ्या जवळ हंसायला लागेल.

[जगदेव येतो.]

**जग०** पण हें ग्रहण कधींही सुटणार नाहीं आणि हा चंद्रही तुझ्याजवळ हंसायला पुन्हां येणार नाहीं. हा चंद्र आपलें काळें तोंड लपवावें म्हणून या ढगाच्या आड, त्या ढगाच्या आड कितीही लपून बसला तरी ही पूर्ण रात्र आपल्या आक्राळ विक्राळ जबड्यांत त्याचा स्वाहा केल्यावांचून राहणार नाहीं !

**चंद्रा०** कां, असं उदासीन कां व्हायचं ?–बाळ विश्वास ! हे कांहीं लोक सांगत आहेत. जा. तूं टोप्या दान कर म्हणजे तुझा चांदोबा बघ तुझ्या-

कडे पाहून हंसतो कीं नाहीं. जा—जा लौकर. सुभान्या ? ने त्याला. [ विश्वास व सुभान्या जातात. ] खरंच गडे ! असे निराशेचे उद्गार आज मुखांतून कां निघताहेत ?

जग० आज मी मुळीं घरीं येणारच नव्हतों. पण तुला आणि बाळाला एकदां डोळे भरून पहावें आणि तुमचा शेवटचा निरोप घ्यावा म्हणून आलों. नको—नको हा अज्ञातवास ! पुरें झालें हें दिवाभितासारखें चोरून छपून राहणें ! मला तर या आयुष्याचा कंटाळा आला आहे !

पद ४ थें. राग कामोद, ताल झापताल.

**लवमात्र नच शांति बघ या मनीं पेटला अनल ज्वाल ॥ धृ० ॥**
**तो राहु ग्रासी नितकाल चंद्रासि, आला जरी काळ ग्रासीत शिवव्याल ॥ १ ॥**

चंद्रा० अरे देवा ! आणखी कांहीं नवीन प्रसंग आला आहे कीं काय ? बोला–बोला गडे ! शिवाजीनें आपला माग काढण्याकरितां आणखी कांहीं सैन्य पाठविलें आहे कीं काय ? आपल्याला मदत मिळायची कुठून आशा राहिली नाहीं कीं काय ?

जग० आशा आणि निराशा ! दोहोंच्या झगड्यांत शेवटीं निराशेचाच जय होणार असं दिसतं.

चंद्रा० असं कां बरं म्हणतां ? आपल्या मित्रांकडून आपल्याला मदत येणार नाहीं का ? जाधव, माने, शिर्के यांनीं तुमच्याकरतां प्राण देऊं म्हणून शपथा घेतल्या नाहींत का ? विजापूरच्या दरबारांतून फौज पाठवतों म्हणून जासूद आला नाहीं का ?

जग० पण पुढें ?

चंद्रा० पुढें काय ? एवढी मदत मिळाली, कीं पूर्वीचे दिवस यायला उशीर का लागणार आहे ?

जग० पण एवढी मदत मिळेल तेव्हांना ? जाधव हल्लीं दरबारच्या कामांत इतके गुंतले आहेत. इतके कीं त्यांना जेवायला वेळ नाहीं. मान्यांना मान वांकडी करून आमच्याकडे पहायला फुरसत नाहीं.

**चंद्रा०** आणि शिर्के—

**जग०** शिर्के, जाधव, माने, सगळे एका माळेचे मणी! हरामखोरांच्या जहागिरीवर जेव्हां गदा आली, त्या वेळीं हा जगदेव नसता तर यांचीं कुळें नामशेष होऊन आज हे मुसलमान सरदारांचे भटारी बनले असते! पण नाहीं, मीं केलेल्या उपकारांचा मी आपल्या तोंडांतून उच्चार सुद्धां करणार नाहीं. त्या गोष्टी त्यांच्या आठवणींतून जशा उडून गेल्या तशा माझ्याही स्मरणांतून मला काढून टाकल्या पाहिजेत.

**चंद्रा०** बरं, पण विजापुराहून दहा हजार सैन्य येणार होतं त्याचं काय झालं?

**जग०** अरेरे, जो प्रश्न नको म्हणून टाळतों आहें, तोच पुनः पुन्हा येतो आहे. ज्यांच्या अन्नावर मी एवढा दसहजारी सरदार झालों त्या अन्नदात्या पातशहाबद्दल माझ्या तोंडून अपमानाचे शब्द निघूं नयेत अशी माझी इच्छा होती, पण—

**चंद्रा०** पण काय? पातशहाकडून कुमक येत नाहीं का?

**जग०** मीं मुसलमान सरदार असतों, तर मला पांच हजार सोडून पन्नास हजारांची कुमक आली असती. पण मी पडलों जातिवंत मराठा! मला मदत कशी येणार? मराठे मराठ्यांनाच खाऊन जर नामशेष होत असले, तर त्यांत पातशहाला आनंदच आहे.

**चंद्रा०** याः! हा चांगला आनंद! निव्वळ कृतघ्नपणा आहे हा! पदरचें खाऊन पांच पांच, दहा दहा हजार शिबंदी पाठवून पातशहाला नवीन मुलूख मिळवून द्यायला आणि त्यांच्या चैनी चालवायला तेवढे मराठे सरदार हवेत. पण त्याच मराठे सरदारांच्या प्राणावर—अब्रूवर प्रसंग आला तर—

**जग०** चंद्रावती! मनुष्यावर दैवाची वक्रदृष्टी झाली, कीं मित्रसुद्धां शत्रू होतात. विजापूरच्या दरबारांत माझ्या जातभाईंना मोठमोठ्या जागा मिळून त्यांची इभ्रत वाढावी, म्हणून मीं पातशहाचा राग सहन केला; शिवाजीच्या हल्ल्यांपासून त्यांचं रक्षण केलं; सैन्य पुरवलं, पैसाअडका, काळ वेळ कशाकडेही पाहिलं नाहीं, त्या वेळीं 'जगदेवराव, जगदेवराव' म्हणून त्यांनीं माझा केवढा गौरव केला! दिग्विजय केलेल्या शिकंदरासारख्या सार्वभौम

राजाचा झाला नसेल एवढया प्रचंड गर्जनेनं माझा जयजयकार केला. पण तोच काळ फिरला! तोच जगदेव त्या निमकहराम शिवाजीशीं भांडतां भांडतां थकला! त्याच्या जहागिरीची धूळधाण होऊन तो रानोमाळ हिंडूं लागला! त्याची ती अफाट फौज धुळीला मिळून त्याच्या भोंवतीं पन्नास-मुंडक्रींही राहिलीं नाहींत! असें पहातांच हे त्याचे मित्र त्यांच्या हांकेकडे दुर्लक्ष करूं लागले, तो समोर आला तर त्याच्याकडे जाणून बुजून तोंड फिरवून चालूं लागले!

**चंद्रा०** मग असें जर आहे तर आपण तरी असल्या कृतघ्न लोकांशीं इतक्या चांगुलपणानें कां वागावें? महाराज! मी म्हणतें, आपण जर शिवाजीराजाला—

**जग०** काय राजा? खबरदार, त्या निमकहरामाला 'राजा' म्हणशील तर! बायको पडलीस म्हणून! दुसऱ्याकुणी जर त्याच्या नांवापुढें 'राजा' अशीं अक्षरें लावलीं असतीं, तर त्याची जीभच छाटून टाकली असती! चोर, लुटारू, बंडखोर, दरवडेखोर तो कसला राजा? आपली मान्यता वाढावी म्हणून तो हरामखोर आपणच आपल्याला 'राजा' म्हणून घेऊं लागला आहे.

**चंद्रा०** महाराज! आपण मला वाटेल तें दूषण द्या, माझी जीभ छाटून टाका, किंवा मला समशेरीनें ठार करा. पण या अजाण दासीची एक विनंति आहे; तेवढी ऐकून घ्या. ही वेळ अणीबाणीची आहे. प्रसंग बिनतोड आहे. आपल्याला कुणी मित्रही राहिला नाहीं. अशा वेळीं आपल्या घराण्याचा नायनाट होऊं नये, वंश राहून जगदेवरावांचे नांव कायम रहावें, अशी इच्छा धरून, जर आपण या कृतघ्न स्नेह्यांना सोडून शिवाजीचे म्हणणें मान्य केलें, तर आपलें राहिलेलें आयुष्य देशसेवेंत जाऊन आपली दिगंतर कीर्ति झाल्यावांचून राहणार नाहीं.

**जग०** हें आपलें पांडित्य बस्स करा. सुखाच्या वेळीं माझी सहधर्मचारिणी म्हणून माझ्याबरोबर राहण्यांत आनंद मानलास आणि आतां या जगदेवावर दुर्दैवाचा फेरा आला म्हणून त्याच्याबरोबर कष्ट सोसायला भितेस होय? माझे मित्र मला ओळखीनासे झाले, पातशहाला माझी कामगिरी आठवे-

नाशी झाली आणि माझी बायको दुर्दैवाला भिऊन मला बेमान होण्याचा उपदेश करूं लागली !

**चंद्रा०** मी भिऊन असें बोलतें असें जर आपल्याला वाटत असेल--

**जग०** बस्स-बस्स झालं हें आयुष्य ! बस्स झाला हा संसार ! बस्स, झाला निर्धार ! माझ्याजवळ अवघे पन्नास मर्द आहेत. पण त्यांना घेऊनच मी शत्रूवर तुटून पडणार. शिवाजीच्या हेरांनीं माझी अगदीं पाठ पुरवली आहे. या दगडाआड लप, त्या झुडपाआड दड; या गुहेंत शीर, त्या झाडावर चढ असा दडून मी किती दिवस राहूं ? अशा भित्रेपणानें एखादेवेळीं शिवाजीच्या हातांत सांपडून एखाद्या चांडाळाच्या तरवारीला बळी पडण्यापेक्षां किंवा, एखाद्या दरवडेखोराप्रमाणे फांसावर गळफांस लागण्यापेक्षां शत्रूशीं सामना करून, समरांत पडणं काय वाईट ! चंद्रावती ! येतों मी आतां—

**चंद्रा०** महाराज ! आपण या; मी आपल्या आड येत नाहीं. पण जाण्यापूर्वी आपण माझ्या विनंतीचा भलताच अर्थ करून, माझ्याबद्दल जो गैरसमज करून घेतला आहे, तो मात्र काढून टाका. मी आपल्याला बेमान होण्याचा उपदेश कशी करीन ? आपण जर स्वामिभक्तीचं इतकं उदात्तस्वरूप नजरेसमोर ठेवलं आहे तर मीं तरी आपल्या आड कां यावं ? मी भित्री आहें असा जर आपला समज झाला असेल तर मला आपल्याबरोबर यायची परवानगी द्या. आपल्या पन्नासांत मी एकावन्नावी होईन. आपल्या तरवारीला दहा बळी पडले तर माझ्या तरवारीला एक तरी पडेल आणि आपल्या प्रेमाला एकदा पात्र झालेली ही चंद्रावती जर शत्रूच्या समशेरीनं काली गेली, तर त्या वेळीं, ही खरी वीरपत्नी आहे, हें तरी आपल्या दृष्टीस पडेल. महाराज ! माझी एवढी विनंति मान्य तरी करा किंवा लढाईवर जाण्यापूर्वीं स्वतःच्या हातानं माझे तुकडे तुकडे तरी करून टाका !

**जग०** चंद्रावती ! तुझ्या भाषणानं माझ्या अंतःकरणाच्या चिंधड्या उडवल्या ! मी राक्षस नाहीं. या माझ्या हातांनीं मी तुला ठार करून, त्याचं पाप कोणत्या जन्मीं फेडूं ? चंद्रावती ! पातशहाशीं स्वामिनिष्ठ राहण्यांत माझी

काय चूक आहे ? जो पेशा मी एकदां पत्करला, जो धनी मीं एकदां स्वीकारला, जो कायदा मीं एकदां मानला, त्याला एखाद्या निगरगट्ट रुपणाप्रमाणें चिकटून राहणंच माझं कर्तव्य आहे. पतिव्रतेला पातिव्रत्याची जी किंमत, तीच आम्हांला आमच्या स्वामिनिष्ठेची आहे.

चंद्रा० मग मलाही माझ्या पातिव्रत्याची कसोटी दाखवायची संधी आपण देतांना ? मलाही आपल्याबरोबर नेतांना ?

जग० मीं तुला बरोबर नेलं असतं. तूं वीरकन्या आहेस तशीच वीरपत्नीही आहेस. पण माझ्या विश्वासाची— [ विश्वास येतो. ]

विश्वा० कां बाबा ! आई वीरमाता आहे असं म्हणायला आपण कचरलां का ? मी कमअस्सल नाहीं, अस्सलाचा बच्चा आहें आणि माझी आई वीरमाता आहे, हें या तरवारीनं सिद्ध करून दाखवीन ! बाबा ! मला आपल्याबरोबर घेऊन चला.

जग० शाबास ! बाळ ! वेळेवर आलास !

विश्वा० मग मी येऊंना ? हो म्हणतांना ?

जग० तूं मला अगदीं थक्क केलंस. पण बाळ ! तूं लढाईवर येऊन काय करणार ?

विश्वा० काय करणार म्हणजे ? लढाई करणार. माझी आई वीरमाता आहे, हें दाखवून देणार ! तुम्ही शिवाजीबरोबर लढूं लागलां, कीं त्याच्या मुलाबरोबर मी लढेन.

जग० ठीक आहे ! लढ. पण त्या शिवाजीचा मुलगा नाहीं अजून लढाईवर जात. तेव्हां तोंपर्यंत तुलाही जातां कामा नये मग बेलाशक जा.—बरं बाळा ! माझा घोडा तयार झाला कीं नाहीं पहा बरं ?

विश्वा० हा निघालों पहा.

[ विश्वास जातो. ]

जग० हें पहा, आतां आपलाच हेका धरून मला आडवूं नकोस. विश्वासाला संभाळ आणि जर या चकमकींत माझा अंतच झाला तर—

चंद्रा० माझाही अंतच झाला म्हणून समजा.

[ विश्वास येतो. ]

**विश्वा०** बाबा ! घोडा तयार आहे. चला, चला लौकर.

**जग०** पहा, पहा ! या चिमुकल्या वीराचा उत्साह पहा ! त्या उत्साहांत तूंही आपला उत्साह मिसळून दे. घे, घे, ते तुझे अश्रु मागं घे. तो हुंदकाही आवर. विश्वासावर विश्वास ठेवून स्वस्थ ऐस. परमेश्वर तुझें रक्षण करील !

**चंद्रा०** आणि सर्व संकटांतून आपणाला पार पाडून आपलं पुन्हां दर्शन घडवील !

पद ५ वें. राग कानडी, ताल त्रिवट.

**चढवा कुला मोक्षाला नाथा रणांत जा हो ॥ ध्रु० ॥**
**हृदयीं सुखाशा । हरिते निराशा । विजयी खचित**
**व्हा हो, जीवा विषाद ना हो ॥ १ ॥**

[ जातात. ]

---

## प्रवेश दुसरा.



### स्थळः—किल्ला.

[ यमाजीभास्कर व हिकमत येतात. ]

**यमा०** काय म्हणतां हिकमतराव ? जगदेवानं अवघ्या पन्नास लोकांनिशीं तुमच्या ठाण्यावर हल्ला केला ? मला नाहीं हें खरं वाटत !

**हिक०** किल्लेदार साहेब ! अगदीं खरं. माझ्याशिवाय आमच्या टोळींतले सारे हेर त्यांनीं कापून काढले. मी पळालों—

**यमा०** काय तुम्ही पळालात ?

**हिक०** नाहीं, मी पळालों नाहीं. आतिशय वेगानं मीं आपले पाय चालविले ! अजमासाबाहेर पायांना गति दिली ! जगदेवाच्या लोकांनीं माझा पाठलाग केला, तेव्हां जरा लपून बसलों !

यमा० काय तुम्ही लपून बसलां ?

हिक० नाहीं ! मी लपून बसलों नाहीं. मी कसा लपून बसेन ? मी काय भित्रा भेंकड आहें कीं काय लपून बसायला ! मी एका दगडाच्या ढिगाऱ्याआड असा छाती काढून (अंग चोरून) उभा राहिलों, कीं जगदेवाचे लोक माझ्या समोरून गेले तरी माझ्याकडे दृष्टि टाकायची त्यांना छातीच झाली नाहीं ! लपून बिपून नाहीं हो बसायचा मी !

यमा० मग काय म्हणतां, ही हकीगत खरी आहे. पण पन्नास लोक आमचं काय करणार ? आमची फौज म्हणजे काय भाजीपाला आहे ? शिवाय या यमाजीभास्कराचा तडाखाही त्याला माहीत नाहीं, असं नाहीं. महाराराजांनीं या किल्ल्याचा मला किल्लेदार केल्यापासून जगदेवाचं मग म्हणजे त्याचा वाडासुद्धां राहिला नाहीं. त्याला इकडे तिकडे सरकायला जरासुद्धां जागा ठेवली नाहीं.

हिक० पण आतां तो जिवावर उदार होऊन बाहेर पडला आहे. आणि यमाजीभास्कराप्रमाणं त्यानं आमच्या सैन्याचा नुसता फडशा चालवला आहे.

यमा० माझं नांव यमाजीभास्कर आहे, तुम्हाला ठाऊकच आहे. माझ्या पराक्रमासुळं माझं नांव इतकं लोकांच्या तोंडीं झालं आहे !

हिक० मग किल्लेदारसाहेब ! पुढं काय करणार तें नाहीं कळलं अजून !

यमा० तुम्ही फार भित्रे दिसतां, तेव्हां असं करा—पण नको, तुह्मीच ठेवा जगदेवाच्या हालचालीवर नजर. मी एक शंभर लोक घेऊन करतों त्याच्यावर हल्ला.

हिक० शंभर लोकांचा काय तिथें कात पुरणार आहे !

यमा० ती पंचाईत तुह्माला कशाला पाहिजे ? तुह्मी जा आणि तोहमतला इकडे घेऊन या. ( हिकमत जातो. ) या जगदेवाचं नांव निघालं, कीं अजून माझ्या अंगाचा तिळपापड होऊन जातो. हरामखोरानं मी त्याच्या सैन्यांत शिलेदार असतांना फितुरीच्या संशयावरून मला फटके मारवले होते नाहीं ? त्या फटक्यांचे डाग जोंपर्यंत बुजाले नाहींत तोंपर्यंत माझी आठवण सदा पेटलेलीच रहाणार ! जगदेवा ! कसा तरी तूं एकदां माझ्या हातांत

सांपड. ह्मणजे त्या फटक्यागर्णात तरवारींचे घाव जर तुझ्या अंगावर न करीन, तर मी नांवाचा यमाजीभास्करच नव्हे ! मी आपल्या अंतःकरणांतला द्वेष आजपर्यंत ओकलों नाहीं, आंतल्या आंत दडपून ठेवला. ( हिकमत व तोहमत येतात. ) काय तोहमतराव !

**तोह०** मी आतां आपल्याकडेच येत होतों.इतक्यांत हिकमतराव भेटले. किल्लेदारसाहेब ! महाराजांचा हा हुकूम आहे. [ लखोटा देतो. ]

**यमा०** ( लखोटा फोडून वाचल्यानंतर ) काय ? महाराज किल्ल्यावर येऊन दाखलसुद्धां झाले ? आणि मला ही गोष्ट कळूंही नये ?

**हिक०** ( स्वगत ) आपल्या ढुंगणाशीं काय चाललं आहे तें तरी तुला कळणार आहे का ?

**यमा०** काय ? जयवंतराव भोसल्याला जगदेवावर पाठवीत आहेत ? आणि मीं नुसता किल्ला संभाळून बसावं ? वाः ! हा धंदा चांगला ! काय असचा मान ! तिजोरींतल्या पैशाची विल्हेवाट करायची जयवंतरावांनीं ! तिजोरीवर पहारा मात्र मीं करायचा ! तें कांहीं नाहीं—मी महाराजांकडे असाच जातों आणि हा हुकूम रद्द करवतों. ( स्वगत ) जयवंतराव ! मालतीनं तुझ्यामुळें माझा अव्हेर केला तोंच तुला माझी कामगिरीही मिळाली अं ! बरं आहे ! जगदेवाबरोबर तुलाही पाहून घेईन. ( उघड ) हिकमतराव ! तुह्मी जरा दूर जा पाहूं. मला या तोहमतरावांजवळ कांहीं बोलायचं आहे. ( हिकमत दूर जातो. पण कान मात्र यमाजीकडे ठेवतो. ) तोहमतराव ! हिकमतरार जरी नांवाजलेलाहेर आहे, तरी तो बराच थापाड्या आहे—

**हिक०** ( स्वगत ) काय मी थापाड्या ?

**यमा०** शिवाय तो बराच भित्रा असल्यामुळं—

**हिक०** ( स्वगत ) काय मी भित्रा ?

**यमा०** कदाचित् घाबरून शत्रूच्या हातीं सांपडण्याचा संभव आहे.

**हिक०** ( स्वगत ) अस्सं काय ! मी घाबरून शत्रूच्या हातीं सांपडणार काय ? वाः ! काय आमची स्तुती !

**यमा०** तेव्हां तुह्मी जगदेवावर चांगली नजर ठेवा. हें पहा, तो आणि-

त्याच्यावर पाठविलेले सरदार हे जयवंतराव दोघे आहेत नातेवाईक ! तेव्हां जयवंतराव त्यांना फितुर होतील. तेव्हां त्यांच्याही हालचालीवर नजर असूं द्या. आणि ते कांहीं दगा करीत आहेत असं तुमच्या नजरेस आलं तर मला कळवा. समजलां ?

तोह० समजलों !

यमा० मग मी आतां महाराजांकडे जातों. तुह्मी आपल्या उद्योगाला लागा. [ यमाजी जातो व तोहमतही जाऊं लागतो. ]

हिक० अहो तोहमतराव ! अहो चालला कुठं ? जरा इकडं या.

तोह० नाहीं. मला लौकर कामगीरीवर जायचं आहे.

हिक० अहो तुह्माला जायचं आहे तसं आह्मालाही जायचं आहे. या जरा.

तोह० अहो पण मला आतां वेळ नाहीं. मग येईन.

हिक० ह्मटलं तुमचा आमचा एकच धंदा पडला तेव्हां जरा माहिती असावी एकमेकांची.

तोह० बिलकूल फुरसत नाहीं हो.

हिक० पण आह्मांला किल्लेदारसाहेबांनीं तुमच्याबद्दल काय सांगितलं आहे तें तुह्मांला कुठं ठाऊक आहे !

तोक० काय-काय सांगितलं आहे बुवा ?

हिक० अहो पण तुह्मांला वेळ नाहीं ! जा, जा !

तोह० आहे हो. सांगा लौकर.

हिक० तुमचं काम आटपून या, मग सांगतों तुह्मांला.

तोह० अहो होईल मग काम. अगोदर सांगा.

हिक० छे, छे ! तुमचं काम फार जरुरीचं-फारच जरुरीचं-अतीच जरुरीचं आहे. जा, जा लौकर.

तोह० नाहीं-नाहीं हो. पण माझ्याबद्दल काय सांगितलं आहे तें सांगा पाहूं ?

हिक० पण—

तोह० पण बीण कांहीं नाहीं नाहीं. माझ्याबद्दल किल्लेदार काय म्हणाले तें सांगा.

हिक० पण प्रथम असं आहे, कीं कुणाची चहाडी सांगूं नये.

तोह० अहो तो वेदान्त नको. हेराचा धंदा आणि चहाडी याचं लग्नच लागलं आहे. पण माझ्याबद्दल—

हिक० शिवाय तें मोठं पाप आहे—

तोह० हेरांनीं पापपुण्याचा विचार करतां कामा नये, अगोदर किल्लेदार—

हिक० किल्लेदाराचं नांव यमाजीभास्कर आहे, ठाऊक आहे ना? मीं सांगितलेलं जर त्यांना कळलं तर—

तोह० त्याची तुम्ही काळजी करूं नका. मी तुमच्या गळ्याशपथ—

हिक० हेर आणि शपथ! बाकी गळ्याची शपथ हेर अगदीं बरोबर पाळतो.

तोह० परमेश्वराला स्मरून—

हिक० हेरांना परमेश्वर सुद्धां भितो.

तोह० आतां सांगतां, का तुम्हाला यमाजीभास्करांच्या समोर—

हिक० कांहो, दम कुणाला देतां? ह्या हिकमतरावाचा प्रताप तुम्हांला माहीत नाहीं? मी सव्वातीन वर्षांचा होतों, तेव्हां बत्रा वाघाच्या शिकारीला गेलों होतों!— . .

तोह० काय? सव्वातीन वर्षांचे असतांनाच वाघाची शिकार?

हिक० अलबत्! तेव्हां मीं जो घोडा उडवला तो एका घोर अरण्यांत गेलों. इतकं दाट अरण्य, कीं बोट शिरकायला जागा नव्हती!

तोह० मग तुमचा घोडा कसा चालला होता तिथून?

हिक० अहो, घोडा काय! त्या जंगलांत हत्तीचे मोठमोठे कळप होते! पण पुढं तर ऐका—पुढं गेलों तों एक डोंगराएवढा हत्ती आपली सोंड रोखून माझ्यावर आला! मागं पाहतों तों एक वाघ! उजव्या बाजूस एक सिंह! आणि डाव्या बाजूस बत्रा एक राक्षस! काय त्या राक्षसाचे केंस, काय त्याचे दांत, काय त्याचे ते डोळे!—

तोह० मग तुम्ही अगदीं घाबरलां असाल?

हिक० अहो, घाबरणं हिकमतरावाच्या कधीं स्वप्नांतही नाहीं! अंधार

आणि उजेड कधीं एका ठिकाणीं राहतील का? छेः! घाबरलों तर मुळींच नाहीं. माझे हात फुरफुरत होते. पाय अगदीं सारखे हालत होते. मला वीरश्री चढली आणि मी देहभान विसरून गेलों! मीं आपली तपकिरीची डबी काढली, आणि एकदम प्रथम हत्तीला दडपला डबींत! नंतर सिंहाला घातला त्याच्यावर! वाघाची तीच अवस्था केली! आणि राक्षसाला चेपणार तों तो राक्षस घाबरला आणि माझे हातपाय धरूं लागला. मीं जी त्याला लाथ मारली, तों तो तीन कोस उडाला!

तोह॰ वाः! फारच पराक्रमी आहां आपण! मग महाराज आपल्यालाच का नाहीं मोठमोठ्या लढाईवर पाठवीत! म्हणजे इतकं सैन्य ठेवायला नको.

हिक॰ पण मला ती गोष्ट कबूल नाहीं. अहो महाराज पाठीस लागले होते; पण मींच नको म्हटलं! कारण मीं आईला तेव्हांपासून तसं वचन दिलं आहे.

तोह॰ काय वचन दिलं आहे?

हिक॰ कीं लढाईच्या ठिकाणीं थांबणार नाहीं ह्मणून.

तोह॰ अस्सं. बरं मग किल्लेदार काय ह्मणत होते तें सांगाना?

हिक॰ आहेचका तुह्माला त्या गोष्टीची आठवण? मला वाटलं विसरलां असाल.

तोह॰ विसरेन कसा.

हिक॰ पण ते संतापले तर काय करूं?

तोह॰ तपकीरीच्या डबींत द्या त्यांना दडपून झालं.

हिक॰ पण आज माझ्याजवळ तपकिरीची डबी नाहीं हो.

तोह॰ मग कनवटीला लावून ठेवा.

हिक॰ छे! तें नाहीं जमायचं, किल्लेदारसाहेबांना कनवटीला लावलं तर कनवट सुटून—

तोह॰ मग?

हिक॰ असं करतों,-मी आपला जातोंच झालं.

तोह॰ खबरदार जाल तर!—

हिक० इथं आतां लढाई होणार ! आतां तर मला आपलं वचन पाळलंच पाहिजे ! जाऊं द्या मला.

तोह० छट् ! किल्लेदार काय म्हणाले, तें सांगा.

हिक० अहो, कांहीं नाहीं म्हणाले. तुमच्या कानांत काय सांगितलं तें काढायला पहात होतों. अहो, एखादा भोळा भेटला कीं, त्याला असंच फसवावं लागतं.

तोह० पण मी भोळा नाहीं, हें आलंच असेल तुमच्या ध्यानांत.

हिक० हं.—कळली आपली अक्कल !

तोह० मग जाऊं आतां मी ?

हिक० मीं तुम्हाला अटक थोडीच केली आहे ? तुम्हाला जायला हुकूम आहे.

तोह० वाः ! अगदीं दरबारी भाषेशिवाय बोलणंच नाहीं. येतों. राम राम.

[ तोहमत जातो. ]

हिक० गुलामाला केव्हां तरी चरुवला पाहिजे. आपलं हिकमती डोकं थोडं चालवलं पाहिजे. यमाजीभास्करानं मला भित्रा ठरवलं आहे ! मी भित्रा ! मी थापाड्या ! वाः ! [ जातो. ]

---

# प्रवेश तिसरा.

## स्थळ:—लढाईचें मैदान.

[कांहीं शिपायी ' हरहर महादेव ' म्हणून ओरडतात. एकटा जगदेव, जयवंतरावाच्या बरोबरच्या लोकांशीं लढतो. जयवंतरावाच्या तरवारीच्या फटक्यानें जगदेवाची तरवार मोडून पडते. जगदेव उभा रहातो. जयवंतरावाचे लोक त्याला धरूं पहातात. ]

जय० हं, दूर उभे रहा. त्यांच्या अंगाला हात लावूं नका. जगदेवराव, तुम्ही आमचे कैदी आहां.

**जग०** ज्यावेळीं माझ्या हातची तरवार उडाली, त्याच वेळीं हें माझ्या ध्यानांत आलं. माझी इच्छा मीं लढाईंत मरावं अशी आहे. कृपा करून माझ्या हातांत तरवार द्या आणि लढतां लढतां मला मरण येऊं द्या.

**जय०** मोठ्या आनंदानं मीं तुमचं म्हणणं कबूल केलं असतं. पण माझा निरुपाय आहे. आपल्याला जिवंत धरावं असाच महाराजांचा हुकूम आहे. आपण आमच्याबरोबर मुकाट्यानं चला. आपण सुटेच चला. आपल्यावर आमचा विश्वास आहे.

**जग०** मी सुटा असलों तर पळून जाईन, असं नाहीं तुम्हांला वाटत ?

**जय०** आपण शूर आहां ! जातिवंत मराठे आहां ! आपल्यावर आमचा विश्वास आहे.

**जग०** एवढ्या सन्मानानं माझ्याशीं बोलणारा शत्रू आजच प्रथम मला भेटला ! तुझं नांव काय ?

**जय०** त्याची कांही इथं जरूरी नाहीं.

**जग०** ज्यानं माझी तरवार उडवून मला बंदिवान् केलं त्याचं नांव ऐकायची इच्छा होणं सहाजिक आहे. काय तुझं नांव काय ?

**जय०** आपली इच्छाच असेल तर माझी ना नाहीं, तें सांगायला. मला जयवंतराव भोसले असं म्हणतात. आपण आतां चालूं लागा.—हें पहा, हवालदार, या जगदेवरावांना किल्ल्यावर घेऊन जा आणि आतां संध्याकाळ झाली आहे, तेव्हां किल्लेदारांना सांगा, कीं यांना रात्रभर नीट बंदोबस्तानं ठेवा. तसंच हे राजकैदी आहेत, तेव्हां त्यांच्या व्यवस्थेंत बिलकुल कसूर होऊं देऊं नका ! उद्यां उजाडल्यावर त्यांना महाराजांसमोर नेतां येईल. जगदेवराव! आपण पुढं व्हां. मी मागाहून येतों. राम राम ! [जगदेव व लोक जातात. ] वाहवारे जगदेवराव ! खरा मर्द ! मूर्तिमंत पराक्रम ! आजपर्यंत पुष्कळ वीरांशीं माझा सामना झाला असेल, पण असला दांडगा वीर आजपर्यंत भेटला नाहीं ! माझ्या सुदैवानं जगदेवरावांची तरवार उडाली म्हणून, नाहीं तर खास त्यानं आज माझा चेंदामेंदा केला असता ! आणि मग मालती ! तुझी माझी पुन्हां भेटही व्हायची आशा नसती ! महाराजांच्या इच्छेप्रमाणं आज मीं जग-

देरावांना जिवंत तर पकडलं ! महाराज माझ्यावर प्रसन्न होणार हें तर आहेच, पण त्यांच्या शाबासकीबरोबरच—मालती ! तुझा कृपाकटाक्ष माझ्यावर पडणार, हा विचार मनांत आला, कीं मन कसं गुंगून जातं. मालती ! मला तुला पाहिल्यावांचून राहवत नाहीं. हा तुझा जयवंत रणांगणावर जय मिळवून आज खरोखरी जयवंत होण्याकरतां तुझ्याकडे आला बघ !—मालती ! मालती !—पण हा काय मीं वेडेपणा चालवला आहे. जगदेवरावांना महाराजांसमोर नेल्यावांचून मालतीचं दर्शन घ्यायला मला मोकळीक नाहीं.

पद ६ वें. राग मुलतानी, ताल रूपक.

आतुर हो रवि चुंबन घ्याया त्या प्राचीचें ॥ धृ० ॥
परि त्यागी सुख, ने विरहीं रजनी, पदयुग वंदि प्रभूचें ॥१॥

[ जातो. ]

---

## प्रवेश चौथा.

—:०:—

स्थळ—मालतीचा बाग.

[ यमाजी येतो. ]

**यमा०** जयवंतरावाचा हुकूम रद्द करून मला स्वारीवर जायची आज्ञा द्यावी, ह्मणून महाराजांकडे जायला जोरानं निघालों, पण अर्ध्या वाटेंतूनच परत फिरलों. काय नामी कल्पना सुचली ! खरोखर माझ्या नशिबानंच जयवंतरावाला कामगिरीवर पाठवायची बुद्धि महाराजांना सुचवली असेल ! जगदेवाच्या तरवारीनं जयवंतरावाला कंठस्नान घातलं तर मालतीची प्राप्ती करून घ्यायला मार्ग आयताच मोकळाच झाला. पण कदाचित् तो जिवंत परत येणार असला, तर तो लढाईवर गुंतलेला आहे तोंच मालतीची पुन्हां एकदां मनधरणी करून तुटलेला सांधा पुन्हां जुळतो कां पाहूं.—पण मालती कुठं आहे ? या बागेंतच भेटती तर चांगलं झालं असतं ! पाहूंया कुठं फिरत असली तर ! नाहीं तर

मग वाड्यांत भेटायला हवं.—अरे, या इतक्या पोरी इकडे कुणीकडे येत आहेत? यांत मालती आहे का?—अरे वा:! आहे! पण या सगळ्या मुलींच्या देखत तिला भेटून उपयोग नाहीं. जरा असे या झुडपाआड दडून बसूं आणि सगळ्या मुली गेल्या, कीं मग तिची गांठ घेऊं.

[ एका झाडाच्या आड दडतो. ]

[ मालती, केतकी, जाई, शेवंती येतात. ]

पद ७ वें. राग जिल्हा, ताल केरवा.

**काय अवसानचि आलें त्यांच्या बाहुंना ॥ उडि घातली रिपुवरी । पाहीना अफझलखां, फिफझलखां कोणिना ॥ धृ० ॥ फोडिला कोथळा बिचवावाघन-खांनीं त्याक्षणीं । अनुचर अवघे पळती । कोणी तेथें राहिना ॥ १ ॥**

**माल०** आणि माझ्या बाबांना शिवाजीमहाराजांनीं कसं जिंकलं सांगूं? तुम्हांला ठाऊक आहे? तुला आहे काग केतकी?

**केत०** नाहीं गडे! तुझ्या बाबांना जिंकल्याचं मी आतांच तुझ्या तोंडून ऐकतें.

**माल०** अग, जिंकलं म्हणजे कांहीं लढाई करून जिंकलें नाहीं! पण बाबांना चीत करून महाराजांनीं बाबांना शरण आणलं!

**शेवं०** तुझं एक एक ऐकावं तें तें आणिकच! लढाइत जर जिंकलें नाहीं तर काय ते झोंपले असतांना त्यांना चीत केलं?

**माल०** अग झोंपले असतांना नव्हे, तर झोंपेंतून जागे करून त्यांना चीत केलें. अग! महाराज म्हणजे लहानसहान का व्यक्ति आहे. पातशाहांनीं बाबांना महाराजांवर पाठवलें आणि बाबांनीं अपरपार सैन्य घेऊन चंद्रगडाला वेढा दिला. गडावर महाराजांचा अगदीं कोंडमारा झाला असें बाबांना वाटून, बाबा रात्रीच्या वेळीं अगदीं आनंदानें डुलत होते. तों बाबांच्या समोर एक भव्य पुरुष एकदम येऊन उभा राहिला.

**जाई०** कोणग बाई तो! महाराज तर नव्हते?

**माल०** ते शिवाजी महराज आहेत, असें बाबांनीं ओळखतांच बाबांनीं एकदम तरवारीला हात घातला; पण महाराजांनीं तो हात तिथल्यातिथें दाबून धरून बाबांना " गप्प रहा " असा इशारा दिला.

**केत०** अगबाई! मग तुझ्या बाबांनीं कायग केलं ?

**माल०** बाबा पहिल्यानें पुष्कळ संतापले! पण नंतर महाराजांनीं जेव्हां आपला भाषणाचा ओघ सोडला, तेव्हां त्या भागीरथीच्या पवित्र उदकानें बाबांचें अंतःकरण स्वच्छ धुवून निघालं आणि आपल्या देशाशीं द्रोह करून पातशहाची गुलामगिरी पत्करल्याबद्दल बाबांना पश्चात्ताप झाला.

**केत०** कां नाहीं होणार! मग पुढं ?

**माल०** पुढें काय! बाबांनीं एकदम महाराजांचे पाय धरले आणि पातशहाची नोकरी सोडून दिली!

**केत०** छान् केलं! आम्हांला निष्कारण छळणाऱ्या त्या पातशहाशीं खऱ्या मराठ्यानं असंच वागलं पाहिजे. पातशाही सरदारांशीं कुणीं सोयरीक करूं नये, पातशाही सरदाराची बायको कुणीं प्राण गेला तरी होऊं नये आणि लग्न लागलंच असलं तर वैरागीण व्हावं; पण तसल्या नवऱ्याची सेवा म्हणून करूं नये. कारण या पातशाही नोकरींत मान का आहे ?

## पद ८ वें. गजल.

**अंत नसे अपमाना त्या कांहीं सेवा शहाची । हत्या मनाची ॥धृ०॥**
**जानें दावोनी डौल पातशाही, निंद्य कृती करी हा ।**
**परि दरबारिं तोंच करि ' जी हां '। खांई कृपेची लाथ शहाची ॥१॥**

**माल०** खरं आहे. पण केतकी! आम्हीं स्त्रियांच्या हातून नवऱ्याला सोडून बैरागी होणें कधींहि घडणार नाहीं. अग, नवरा कितीही नादान, नीच, देशद्रोही असला तरी त्याची मनोभावानं सेवा करणेंच आम्हां स्त्रियांचं कर्तव्य आहे. नादानपणापासून पतीचं मन परावृत्त करण्याचा तुम्ही प्रयत्न करा, नीच मनोवृत्तीपासून त्याला दूर राखण्याची तुम्ही खटपट करा, त्याचा देशद्रोह झाडून टाकून त्याला स्वदेशभक्त बनविण्याचा तुम्ही उद्योग करा. पण तो देशाभिमानी नाहीं म्हणून त्याला त्याज्य समजून तुम्ही त्याची हेळसांड मात्र करूं नका.

**शेवं०** मालती! खरं आहे तुझं म्हणणं. मला सुद्धां तसंच वाटतं. तुझी ताई चंद्रावतीच पहाना! आपल्या महाराजांना तिचा नवरा एवढा पाण्यांत पहातो आहे, पण त्याच नवऱ्याच्या सेवेंत ती आनंदांत आहे ना?

पद ९ वें. राग धानी, ताल केरवा.

**सहनशीला गेहीं नाथाची सेवा पाही ॥ ध्रु० ॥**
**जरी पति–दुःखें गेली गांजुनिया । साध्वी स्मितमुख राही॥**
**सकल जिवित निज पति रमणीं । तन मन धन पतिच्या**
**चरणीं ॥ विनयानें प्रेमें राही नाथाची सेवा पाही ॥ १ ॥**

**माल०** ताईची गोष्ट अगदीं निराळी आहे. बाबा जेव्हां महाराजांच्या पक्षाला मिळाले आणि अनेक खटपटी करूनही जगदेवरावांच्या हृदयांत स्वराज्य रवीचीं किरणं प्रकाश पाडीत नाहींत, असं बाबांच्या अनुभवाला आलं, तेव्हां ताईला पातशाही सरदाराला दिल्याबद्दल त्यांना वाईट वाटलं! आणि जगदेवरावांच्या परवानगीनं जरी ताई आमच्या घरीं एखादे वेळीं येत होती, तरी बाबांच्या मनाला मरेपर्यंत ताईचा घात झाला असंच वाटत होतं. जग-देवराव जर अजून महाराजांच्या पक्षाला मिळतील तर बाबांच्या मनाला स्वर्गांत अजून आनंदच वाटेल!

**केत०** का नाहीं वाटणार! तुझे बाबा किनई तसेच प्रेमळ होते.– अग, पण आपण गप्पा काय ठोकीत बसलों, आपल्याला फुलं गोळा करायचीं आहेत ना! चल, मालती! चल त्या जाळीजवळ! तिच्यावर बरींच फुलं फुल-लेलीं आहेत.

**माल०** मी नाहीं गडे येत. मी जरा इथंच बसतें. बाबांच्या संबंधाचे विचार आल्यामुळें माझं मन जरा उद्विग्न झालं आहे. तुम्हीं सगळ्याजणींनीं फुलं गोळा केलीत, कीं मी त्यांतलींच चार घेईन म्हणजे झालं!

**शेवं०** बरं तर आम्ही जाऊं वेंचायला? चलाग सगळ्याजणी.

[ शेवंती, केतकी व जाई जातात ].

**माल०** देशभक्त वीराबद्दल लहान मुलीच्या मनांत केवढा आदर असतो पहा. पण या आदराच्या भरांत पतीच्या इतर सद्गुणांबद्दलही विचार करा

यला नको का ? देशभक्तीच्या थोर पांघरुणाखालीं संसारसुखाची राख करणारे व आपल्या सुहृदांना अधोगति दाखवणारे दुर्गुण असले तर ती देशभक्ति स्त्रियांच्या नाजूक मनोवृत्तींना विसावा घ्यायला तापदायकच नाहीं का होणार ? जयवंतरावांच्या देशभक्तीबरोबर त्यांच्या इतर सद्गुणांची प्रभावळ त्यांना किती शोभा देते ! इतकंच नव्हे, तर त्या प्रभावळीमुळं त्यांच्या देशभक्तीला आणि माझ्या प्रेमाला केवढी उज्ज्वलता आली आहे !—

**पद १० वें. राग महाडी, ताल केरवा.**

**प्रभावळ कांति रमवित मन ती ॥ ध्रु० ॥**

**शशि नभिं आला मोहि मनाला । तारांगणीं शोभाती ॥ १ ॥**

**विजय नृपाला कीर्ति नयाला । मंत्रि वंद्य जरि असती ॥ २ ॥**

**प्रणय-प्रभेला पूर भरियला प्रेमी शुद्ध ते होती ॥ ३ ॥**

पण—अगबाई ! इथं खुसबुसलं काय बरं ?—त्या पलीकडच्या जाळींतून आवाज कसला आला ! एखादा काळसर्प तर नसेल ! या काठीनं तें जाळवंड जरा झोडपावं म्हणजे काय असेल तें आपोआप बाहेर येईल.

[ काठीनें जाळी झोडपते. यमाजी येतो. ]

**यमा०** अरे बापरे ! अहो—मी—मी—यमाजी—

**माल०** यमाजी ! तुम्ही काय करीत होतां इथं ?

**यमा०** कांहीं नाहीं. मी आपला—

**माल०** आपला काय ! बोला लौकर.

**यमा०** कांहीं नाहीं. मी जरा—तुम्ही सगळ्या मुली होतां इथं तेव्हां जरा आड बसलों—

**माल०** कां बसलां ? कशाला बसलां ?

**यमा०** कशाला आणि का कांहीं विशेष नाहीं.

**माल०** तुम्ही नीट उत्तर द्या, नाहीं तर—

**यमा०** नाहीं, मला थोडी कळ आली म्हणून जरा आड बसलों.

**माल०** कसली कळ आली तुम्हांला ?

**यमा०** आतां काय उघड सांगूं ? मालती ! तुला पाहिल्याबरोबर मला प्रेमाची कळ आली.

**माल०** हं ! अस्सं ! मग ?

**यमा०** मग काय ! औषध देऊन मला बरा कर. तूं आपला नाजुक गोंडस हात माझ्या अंगावरून फिरवलास तर महा पुण्यवान् रामदासस्वामीपेक्षांही जास्त त्वरेनें माझ्या मृत देहांत प्राण आणशील ! तूं आपल्या नेत्रांचे दोनच कटाक्ष माझ्यावर फेंकशील तर शस्त्रक्रिया करणाऱ्या एखाद्या वैद्यापेक्षांही जास्त शिताफीनें माझी कळ बंद करशील ! आणि तूं आपल्या अधरामृताचा एकच घुटका मला देशील तर शेंकडो वनस्पतींच्या रसाचे समुद्र पिऊनही होणार नाहीं असा वज्रदेह या यमाजीला प्राप्त होईल !

**माल०** यमाजी ! मीं हजार वेळां तुम्हाला स्पष्ट नाहीं म्हणून सांगितलं असून तुम्ही माझा उगीच का छळ करतां ? तुमच्याशीं एक शब्द सुद्धां जास्त बोलण्याची माझी इच्छा नाहीं. मी तुम्हाला एकच सांगतें, कीं तुम्ही या पावलीं–अस्सेच्या अस्से इथून निघून जा.

**यमा०** मी इथून निघून जाऊं ? माझ्या देवतेची मूर्ति मीं आपल्या प्रार्थनेनें आळवायची सोडून इथून चालता होऊं ? नाहीं–नाहीं, मालती ! स्त्री ही पुरुषाची सावली आहे असं कोणी म्हणोत, पण मी तर म्हणतों, कीं पुरुष हीच स्त्रीची सावली आहे.

**माल०** हें तुमचं रडगाणं बस्स करा आणि एकदम इथून चालते व्हा. नाहीं तर मी इथून जातें कशी. [ जाऊं लागते. ]

**यमा०** तूं जाऊं नकोस. मी तुला कसा जाऊं देईन ! माझ्या बाहूंमध्यें अशी तुला अडकवून ठेवीन ! [ मालतीचा हात धरतो. ]

**माल०** हं, सोडा माझा हात.

**यमा०** छे, छे ! हा हात मी नाहीं सोडणार. मालती, तुझा हात माझ्या हातांत आहे. मी तुझं हें पाणिग्रहण केलं आहे. आतां माझ्यापासून तूं दूर कशी होणार ?

**माल०** कशी होणार ! दाखवूं ? ही अश्शी—

**यमा०** मालती ! तुझे श्रम व्यर्थ आहेत. माझ्या हातांतून तुझा हात सुटणं शक्य आहे का ? चल, आपण त्या जाळींत—

[ ओढूं लागतो. ]

माल० केतकी ! अग शेवंती ! धांवा, धांवा ! या काळसर्पाला आडवून धरा. [ केतकी, जाई, शेवंती काठ्या घेऊन येतात.]

सर्व० अरे मेल्या ! [ यमाजीस सर्व झोडपतात.

पद ११ वें. राग भूप, ताल दादरा.

**तूं कुमति कुटिल कपटि कुजन निंद्य ही जनीं ॥**
**चल अधमा इथुनी । जा जा जा निघुनी ॥**
**मन कटुतर । बल तिलभर । नय लवभर ।**
**लाज ना मनीं ॥ धृ० ॥ छंदि फंदी । नीच नंदी ।**
**मार शिरीं खांदी ॥ भ्याड वीरा । सोडि तोरा ।**
**जाइ चोरा । येथुनी ॥ १ ॥ मन कटुतर० ॥**

यमा० अरे बापरे ! अहो मी जातों-मी जातों. ( पळतां पळतां ) याचा सूड घेईन बरं. [ यमाजी जातो.]

केत० पळाला मेला भागुबाई !

शेवं० मेल्याचं काळीज उलटं आहे काग !

जाई० माझ्या मनांतून त्याला उलटा टांगायचा होता.

माल० कायग बाई तरी ! मला एकटीला त्यानं अगदीं भेवडावलं बघ—

केत० कायग, काय केलन् त्यानं ?

माल० करतो काय मेला ! मला म्हणत होता—

केत० काय, काय म्हणत होता ?

माल० कीं माझी बायको हो.

केत० कायग बाई तरी ! अरे मेल्या ! मग तूंग काय केलंस ?

माल० मी काय करणार ? पण चला आपण त्या धक्क्यावर बसूं आणि मग मी तुम्हाला सगळी हकीगत सांगतें. [ जातात. ]

---

# प्रवेश पांचवा.



स्थळ:—तुरुंग.

पद १२ वें. राग मालकंस, ताल झपताल.

मज गमे जीवन नरकवास ॥ ध्रु० ॥ मरण नाहीं रणीं ।
कुजत बंदींत मी । नचुके लिखित देवास ॥ १ ॥

जग० ( स्वगत ) बंदिवास ! सृष्टीच्या उत्पत्तीपासून जीवन त्याच्या मागं हा बंदिवासाचा भोग लागलेलाच आहे ! परमेश्वरानं आपलं बुद्धिसर्वस्व खर्च करून, ही बंदिवासाची कल्पना निर्माण केली आणि त्या कल्पनेला मूर्तस्वरूप देऊन हा सृष्टीचा भलाभक्कम बंदिखाना त्यानं तयार केला ! हा बंदिखाना नेहमीं भरलेला रहावा, एवढ्याकरतां परमेश्वरानं अनंत आत्मे निर्माण करून त्यांना संचार करायला कांहीं विवक्षित प्रदेश आंखून दिले. हे प्रदेश म्हणजे लहान लहान बंदिखानेच ! गुन्हेगार आत्मे परमेश्वराच्या न्यायासनासमोर आले, कीं त्यांना निरनिराळ्या गुन्ह्याप्रमाणं निरनिराळ्या योनिमध्यें तो जन्माला घालतो. या योनी म्हणजे बंदिखानेच ! आत्मा हा कैदी आणि शरीर हा कैदखाना ! राजापासून रंकापर्यंत हा कैदखाना कुणाच्याही नशिबाचा सुटत नाहीं. प्राण्याची गोष्ट राहोच, पण हे चंद्र, सूर्य आणि तारे सुद्धां कैदखान्यांतल्या कैद्याप्रमाणं ठराविक मार्गानं फिरत असतात. चंद्रसूर्यांना परमेश्वरानं सक्तमजुरीची शिक्षा देऊन या आकाशाच्या बंदिखान्यांत टाकलं आहे. शारिरीक बंदिखान्याची जाणीव संवयीमुळं प्राण्यांना होईनाशी झाल्यामुळें, परमेश्वर राजाच्या रूपानं या पृथ्वीवर अवतरला आणि त्यानं ही बंदिवासाची अदृष्य कल्पना दगडी भिंताडाचे कैदखाने बनवून दृष्यस्वरूपांत आणली ! लढाईत सांपडलेल्या कैद्याला सुद्धां या दगडी कैदखान्याची हवा घ्यावी लागते ! हीं दगडीं भिंताडं आमचा महाल ! आणि हा दगडी चौथरा आमचा बिछाना !

[ चौथऱ्यावर पडतो इतक्यांत यमाजी व दोन शिपायी येतात. ]

**यमा०** जगदेवाला कैद करून आणल्याची बातमी अजून महाराजांना समजली नाहींना ?

**शिपा०** छें! अजून नाहीं समजली.

**यमा०** मग ठीक आहे. आतां असं करा, इथं उभे रहा आणि मीं हुकूम केला, कीं त्याची गर्दन उडवा. ( जगदेवाजवळ जाऊन ) काय जगदेवराव ! ए जगदेव ! –ए हरामखोर !—

**जग०** हरामखोर ! हरामखोरे ह्मणणारा तूंरे कोण ?

**यमा०** मीं कोण ? दिसत नाहीं का तुला ? नीट डोळे उघडून बघ ! हा माझा चेहरा पहा ! आहे का ओळखीचा ? आठवतंका माझं नांव ? आंठवत नसलं तर मीं सांगतों. माझं नांव यमाजीभास्कर !

**जग०** यमाजीभास्कर ! कोणत्या नरकावर शिवाजीनं तुझी नेमणूक केली आहेरे !

**यमा०** तूं ज्यांत पडला आहेस त्याच नरकावर माझी नेमणूक आहे समजलास. या किल्ल्याचा मीं किल्लेदार आहें.

**जग०** असशील !

**यमा०** माझ्याकडं पहा !

**जग०** कोण हा जुलूम !

**यमा०** मी तुझा शत्रू आहें.

**जग०** असशील !

**यमा०** मी तुझा सूड घेणार आहें.

**जग०** घेशील !

**यमा०** मी तुला ठार करणार आहें.

**जग०** करशील !

**यमा०** मी तुला संतापून बोलतों आहें, आणि तूं मला " असशील, घेशील, करशील " अशीं उद्दापणाचीं उत्तरं देतोस काय ! मीं काय गाढव आहे वाटतं !

**यमा०** असशील !

**यमा०** कुत्रा !

**जग०** असशील !

**यमा०** रेडा !

**जग०** असशील !

**यमा०** बैल !

**जग०** बस्स ! पुरे कर बवबड. मला स्वस्थ पडूं दे.

**यमा०** तुला स्वस्थ पाडण्याकरतांच हा यमाजीभास्कर आला आहे. हे पाहिलेस यमदूत ! पहा, त्यांच्या हातांतल्या तरवारी पहा ! म्हणजे तुझी खात्री होईल.

**जग०** निमकहराम ! बडबड बस्स कर आणि इथून चालता हो.

**यमा०** मला निघून जाण्याचा हुकूम तूं रे कोण करणार ? ऐक. मी तुला ठार करणार आहें. पण ठार करण्यापूर्वी माझा जो तूं अपमान केला आहेस त्याची तुला बरोबर आठवण देतों. फितुरीच्या आरोपाबद्दल मला मारलेल्या फटक्यांची तुझी आठवण बुजली असेल, पण माझ्या पाठीवरचे त्या फटक्यांचे वण अद्याप बुजाले नाहींत. माझ्या अपमानाबद्दल सूड घेतल्यावांचून मी कसा राहीन !

**जग०** मग तुला काय माझें डोकं उडवायचं आहे ? हें घे उडव डोकं !

[ पुढें उभा रहातो. ]

**यमा०** ( तरवार उपसून ) घे देवाचें नांव ! शिपायीहो, उपसा तरवारी आणखी उडवा गर्दन !

**जग०** जय शंकर !

[ यमाजी तरवार उगारतो तोंच भिंतीच्या चोरदारांतून शिवाजी येतो. ]

**शिवा०** यमाजी !

**यमा०** अरे बापरे ! महाराज !

**जग०** माझी हाक ऐकून प्रत्यक्ष शंकरच अवतरला नाहींना ?

**शिवा०** यमाजी ! तुम्ही काय करीत होता ?

**यमा०** सरकार ! गुन्हा माफ व्हावा. मी तुरुंगाचा बंदोबस्त पहायला आलों, तों हे जगदेवराव मला शिव्या देऊं लागले. मला राग सहन न झाल्यामुळें मी तरवार उपसली. माफ करा सरकार.

शिवा० ठीक. माफ. तुम्ही प्रामाणिक नोकर असून वेळोवेळीं आमच्या फार उपयोगीं पडला आहां म्हणूनच तुम्हाला माफी दिली आहे. पण लक्षांत ठेवा जगदेवराव राजकैदी आहेत. त्यांच्या जिवाला धक्का लागला तर तुमची गर्दन उडवली जाईल.

यमा० जी हुकूम.

शिवा० जा तर बाहेर उभे रहा.

यमा० महाराज! या बेफाम जगदेवाजवळ आपण एकटेच—

शिवा० बस्स, माझं मला कळतं! जा बाहेर तुम्ही!

[ यमाजी व शिपायी जातात. ]

शिवा० जगदेवराव!

जग० शिवाजी!

शिवा० आपली भेट झाली, चांगलं झालं.

जग० खरोखरच आपली भेट झाली चांगलं झालं.

शिवा० मला तुम्हाला एक हिताची गोष्ट सांगावयाची आहे.

जग० मलाही तुला एक हिताची गोष्ट सांगावयाची आहे.

शिवा० तुम्ही पातशहाची गुलामगिरी सोडून कांहीं तरी देशहित करा.

जग० तूं पातशाहाची चाकरी पत्करून स्वतःचा नांवलौकिक वाढीव.

शिवा० जगदेवराव! नांवलौकिक वाढवण्याकरतां स्वतःला गुलामगिरींत टाकायला नको. गुलामगिरी नामर्दांकरतां आहे. मर्दांकरतां नाहीं. खरंना?

जग० कबूल. पण पातशहाची नोकरी म्हणजे गुलामगिरी नव्हे. मी तिला गुलामगिरी खास म्हणणार नाहीं.

शिवा० गुलामगिरी नाहीं तर काय? जगदेवराव! तुह्मी पातशहाची नोकरी कशाकरतां करितां? पोटाकरतां? तुम्हाला पोटाला कांहीं कमी आहे का? कुत्र्याला सुद्धां आपल्या पोटाची काळजी परमेश्वरानं ठेवली नाहीं. मग तुम्हाला पातशाहाची नोकरी पोटाकरतां केली पाहिजे का?

जग० जोंपर्यंत पातशाहाचं अन्न खातों आहें तोंपर्यंत पातशाहाची नोकरी मला केलीच पाहिजे.

शिवा० तुम्ही पातशाहाचं काय अन्न खातां? तुमचंच अन्न तुम्हीं खातां. पातशाहा तुम्हाला देत असलेला तनखा तुमच्या जहागिरीच्या खंडणीं

तूनच तुम्हाला मिळतोना ? तुम्हीच जमीन करतां, तुम्ही वसूल करतां आणि स्वतःच्या पाठीवर गोण्या लादून त्या पातशाहाच्या खजिन्यांत तुम्हीच नेऊन ओततां ? पातशहाचं पोट भरलं, कीं तो दोन शितं तुमच्या पुढ्यांत टाकतो. त्या दोन शितांला भुलून तुम्ही कुत्र्याप्रमाणं त्याच्यापुढं गोंडा घोळतां आणि त्यानं 'छू' केलं, कीं लागलेच आपल्या जातभाईंच्या अंगावर तुटून पडतां !

**जग०** तूं मला कुत्र्याची उपमा दिलीस; पण आपल्या धन्याशीं कुत्र्या-प्रमाणं स्वामिनिष्ठ रहाणंच आम्हाला इष्ट आहे.

**शिवा०** तुम्हाला जें इष्ट वाटतं तेंच मला अनिष्ट वाटतं. कौरवपांडवांच्या युद्धाच्या वेळीं भीष्मद्रोणांसारख्या पुरुषांनीं जर आपल्या फाजील स्वामिनिष्ठेला लगाम घातली असती तर या भरतखंडाचं सार्वभौमत्व आज त्रिभुवनानं मान्य केलं असतं ! आणि जगदेवराव ! तुमच्यासारख्या तेजस्वी पुरुषाला दुसऱ्याच्या ओंजळीनं पाणी प्यायची वासनाच झाली नसती ! पातशाहानं आपल्या लटक्या वभवानं तुम्हांला दिपवून टाकलं ! पण त्या दिपण्याच्या निद्रेतून जागे होऊन अद्याप तुमचे डोळे उघडत नाहींत याला काय म्हणावं ? जगदेवराव ! विजा-पुरकरांनीं शेंकडों हिंदूंना बाटवून मुसलमान केलं हें तुह्माला बरं वाटतं ना ? आणि या जुलमाचा प्रतिकार करण्याकरितां गरीब बिचारे हिंदु प्रयत्न करूं लागले तर त्यांच्या मदतीला तुम्हीं धांवून यायचं सोडून तुम्ही त्यांची कत्तल करायला उद्युक्त व्हावं ना ? जगदेवराव ! धन्य धन्य आहे तुमच्या धर्मभक्तीची !

**जग०** मी जातीचा अस्सल हिंदु आहें आणि पादशहाच्या कृपेनं मी हिंदूच राहणार. जुलमानं हिंदूंना बाटवून मुसलमान केलं ही गोष्ट अगदीं खोटी आहे. मुसलमानी धर्माच्या श्रेष्ठपणाची खात्री होऊन कित्येक हिंदु स्वखुषीनं मुसलमान झाले आहेत अशीच दरबारची समजूत आहे.

**शिवा०** अरेरे ! गरीब गाईंचा हंबरडा क्षीरसागरांत ऐषआरामांत लोळत पडलेल्या शेषशाई नारायणाच्या कानांवर जात नाहीं. खेड्यापाड्यांत शिरायचं, विहिरी तलाव भ्रष्ट करून खेडींच्याखेडीं बाटवावयाचीं; आणि दरबारांत मुस-लमानी धर्माची महती गाऊन अशल्या अनाचारावर पांघरूण घालायचं ! गरीब. दुबळ्या प्रजेवर डोईपट्टीसारखे अनेक कर लादून, जबरदस्तीनं पैसा उकळायचा

आणि तो पैसा लोकांनीं खुषीनं दिला म्हणून शेखी मिरवायची! जगदेवराव! असल्या खुषीच्या जुलमाला आळा घालायचा प्रयत्न आपण कधीं केला आहे काय?

**जग०** पण या गोष्टी जर कधीं आमच्या कानींही आल्या नाहींत तर आम्ही तरी काय करणार?

**शिवा०** पातशाहाच्या खुशामती सरदारांच्या नगाऱ्यापुढं गरीब प्रजेच्या रडण्याच्या टिमक्या काय टिकूं जाणार? त्यांच्या तोंडपुजेपणाच्या त्या तोफांच्या धुमधडाक्यापुढं प्रजेच्या फुसक्या फुट्कफळांचे फुटफुट आवाज काय टिकणार? त्यांच्या त्या डामडौलाच्या लखलखाटापुढं या मिणमिण करणाऱ्या दिवल्या काय प्रकाश पाडणार?

**जग०** बस्स–बस्स. हें राजद्रोहाचं भाषण एकदम बंद कर. मला तें ऐकवत नाहीं. कुणाही राजनिष्ठ सेवकाला तें ऐकवणार नाहीं.

**शिवा०** पण तें ऐकून घ्यायचीच तुम्हांला संवय केली पाहिजे. जगदेवराव! हा राजद्रोह नव्हे, खरी स्थिति मीं तुम्हांला सांगितली. तुम्हांला वाटत असेल मी पातशाहाच्या विरुद्ध आहें, पण तसं नाहीं. तुम्हांला वाटत असेल मी मुसलमानीधर्माच्या उलट आहे, तर तसंही नाहीं. त्या व्यक्तीबद्दल मला आदर आहे; तसाच मुसलमानी धर्माबद्दलही मला मुसलमानाइतकाच आदर आहे. माझ्या फौजेंत हिंदूप्रमाणंच मुसलमानही सैनिक आहेत आणि माझ्याशीं ते स्वामिनिष्ठेनंच वागत आहेत. मला मुसलमानांबद्दल द्वेष नाहीं. मला जो संताप येतो तो त्यांच्या धार्मिक जबरदस्तीचा–जुलमाचा! आणि कुणाही अस्सल मराठ्याला त्याबद्दल संताप वाटलाच पाहिजे.

**जग०** तूं मेहेरबानी करून एक गोष्ट करशील का? एक हें आपलं भाषण तरी बंद कर, नाहीं तर या तरवारीच्या एका फटक्यानं माझी गर्दन तरी उडवून दे.

**शिवा०** मी तुमची गर्दन उडवून द्यायला आलों नाहीं, गर्दन वांचवायला आलों आहें. जगदेवराव! ज्या हिंदुपदपातशाहीचा पाया घालण्याकरतां आज हजारों जवान जिवापाड मेहनत घेत आहेत; त्यांच्या प्रयत्नाला हातभर लावा. त्यांच्या श्रमाचं चीज करा. तुमच्यासारख्यापराक्रमी पुरुषाचं साहाय्य मिळाल्यावर काय होणार नाहीं? या मराठेशाही वृक्षाची जोपासना

करायला तुमच्यासारख्या अभिमानी सेनापतीची अत्यंत जरूरी आहे. जग-देवराव ! हा महाराष्ट्र तुम्हाला हाक मारतो आहे.

**जग०** हीं स्तुतिस्तोत्रं बस्स कर. पातशहाची निंदा ऐकायचा जसा मला तिटकारा आहे, तशीच माझी रिकामी स्तुति केलेली मला खपत नाहीं. जा, आपल्या पांडित्याचं प्रदर्शन तुझ्या त्या लंगोट्या मावळ्यांच्यापुढें कर. या अस्सल राजनिष्ठ जगदेवापुढं करूं नकोस.

[ एका बाजूस जाऊन बसतो. शिवाजी कांहीं वेळ त्याच्याकडे पाहून सुस्कारा सोडतो. ]

**शिवा०** सिंहाला आपल्या स्वभावाची विस्मृति व्हावी ना ? सूर्याला आपल्या तेजाची आठवण करून द्यायला लागावी ना ? बा महाराष्ट्रा ! तुझ्या सुपुत्रांच्या हृदयांत तुझ्याबद्दल दया येत नाहीं त्याला काय करावें !

[ पडदा पडतो. ]

## अंक पहिला समाप्त.



# अंक दुसरा.



## प्रवेश पहिला.



स्थळ:—रस्ता.

[ फकिराच्या वेषांत तोहमत दोहोरा म्हणत येतो. ]

तोह० अल्लाके प्यारे तेरे नगरीमें बोलता रब कौन ।
मौलाके प्यारे तेरे नगरीमें बोलता रब कौन ।

या अल्ला खुदा रहेमान इलाइया रसूल अल्ला । ( हंसतो ) आज या फकिराच्या सोंगावर किती तरी पैदास्त झाली. आमच्या या गडावर शिवाजी महाराजांचा झेंडा फडकतो आहे, तेव्हां मला वाटत होतं, कीं इथें मुसलमान फकिरांना उपाशी मरण्याची पाळी येत असेल. पण या रहिवाशांच्या धर्मबुद्धीचें कौतुक वाटतं. ज्यानं त्यानं हाक मारून म्हणावं " बाबाजी हा पैसा घ्या " आणि माझ्या पदरांत पैसा टाकावा. स्वतः महाराजांनीसुद्धां मला हाक मारून एक मोहोर दिली ! पण ती मोहोर घेतांना छाती अशी धडधडत होती, कीं काय पुसूं नका. महाराज माझ्याकडे रोखून पाहूं लागले, तेव्हां तर माझी पाचांवर धारण बसली. माझं सोंग आहे, हें त्यांनीं ओळखलं पाहिजे आणि मीं इतकं सोंग केलं म्हणूनच त्यांनीं मला मोहोरेची बिदागी दिली ! खास असंच असलं पाहिजे. वाः ! काय कमाई ही ! मला वाटतं सोंग घेऊन गांवोगांव आणि दारोदार हिंडणारे बहुरूपी फारच पैसा मिळवीत असतील ! बहुरूप्याचा धंदा म्हणजे प्रतिष्ठित भिकाऱ्याचाच धंदा कीं नाहीं ! " लगिनाला जातों आम्ही लगिनाला जातों, " असं ह्मणून वाटेल तीं बडबड करायची, निरनिराळीं पौराणिक आणि ऐतिहासिक व्यक्तींचीं सोंगें घेऊन त्यांच्या नकला करायच्या, आणि लोकांच्या मर्जीप्रमाणें नाचून त्यांना खूष

करून पैसे कमवायचे ! या लोकांना कांहीं कसब तरी दाखवावं लागतं; पण धंदेवाईक भिकाऱ्याची चैन तर कांहीं विचारूंच नका ! मीं सोंग घेतलेला, पण लोकांच्या समजुतीनें धंदेवाईक भिकारीच कीं नाहीं? आणि या भिकारी धंद्याची ही दोन घटकेची केवढी तरी कमाई ! माझ्याबरोबर माझ्या पाठोपाठ एक भिक्षुक ब्राह्मण जिथं तिथं जाऊन 'ॐ राजाय राजप्रसवे' म्हणून मोठ्यानं ओरडतो आहे आणि ओंजळ ओंजळ पैसे घेऊन बाहेर येतो आहे. खरंच भिक्षुकीच्या धंद्यासारखी मज़ा नाहीं. अरे, हा पहा तो ब्राह्मण इकडेच येतो आहे. याची जरा गम्मत करून नंतर यमाजीभास्कराकडे हजिरी द्यायला जावं. ( भिक्षुकाच्या वेषांत हिकमत येतो. ) क्यों पंडत ! पैदास्त तो अच्छी है, नहीं ?

**हिक०** अरे फकीरा दूर उभा रहा. मस विंटाळ होईल.

**तोह०** विंटाळ होईल ! विंटाळ मायने क्या है. आप क्या कोई औरत है !

**हिक०** मी औरत ! मस औरत म्हणतोस कायरे फकीरड्या ! विंटाळ काय बायकांसच होतं असं नाहीं, आम्हां-ब्राह्मण पुरुषांसही होतो हो.

**तोह०** ब्रिन्हामन पुरुषको तो मै औरतही समजताहूं. फेर आपका ख्याल क्या है ?

**हिक०** ख्याल ! ख्याल कशास म्हणतात, तें मस काय ठावें ! आपल्या टप्यांत तर कांहीं हा शब्द येत नाहीं.

**तोह०** आपनी हालहवाल क्या है इतनाही मेरा सवाल है.

**हिक०** तुझ्यासारख्या फकिराशीं गांठ पडली, कीं माझे हाल विचारूं नकोस आणि हवाल्याबद्दल म्हणशील तर मी रोखीचा धंदा करतों. दक्षणेंत हवालाबिवाला नाहीं ऐकत.

**तोह०** आप क्या भिक्षुक है ! आप भीक मांगते है ?

**हिक०** भीक म्हणूं नकोस. मी दक्षणेस घेतों. ही भीक नव्हे बरं. मी भिकारी नव्हे. भिक्षुक आहें.

**तोह०** शाबास ! [ पाठीवर हात मारण्यास जवळ जातो. ]

**हिक०** हं दूर सर.-मस शिवूं नकोस. तूं मुसलमान आहेस. तूंस दिसत

नाहीं ? तूंस किल्लेदाराकडे नेऊन फटके चढवायास हवें. हेंच किल्लेदारसाहेबांचें घर. मी घरांत जातों आणि त्यास बाहेर घेऊन येतों.

**तोह०** पंडतजी ! मेरा ख्याल तो सुनो.

**हिक०** मला तुझा ख्याल सुनायला वेळ नाहीं.

**तोह०** पंडतजी ! मेरा दिलमे तो ऐसा है के आपने आज तो बहोत पैसा कमाया है. मैं तो एक गरीब फकीर हूं, परदवरदिगार का ताबेदार हूं. आप खुष होकर अल्लाके नामके एक दिडकी मुजको दे देवें.

**हिक०** दिडकी ! अरे दिडकीस काय श्रम पडतात, तूंस कुठें कळतें ! दिडकीसाठीं आमचा प्राण जातो. प्राणास देऊं पण दिडकीस नाहीं सोडणार आम्ही.

**तोह०** अच्छा. जैसी आपकी मर्जी. मेरा कहेना तो ए है, के अल्लानें आपको ज्यो कुछ दिया है, उसमे थोडा धरमही करना चाहिये.

**हिक०** अरे जा. तुझा असला धरम बिरम मैं नहीं जानत. तूं आज बरेचसे पैसे गोळा केले आहेस. त्यांतली एक दिडकी तरी तूं मला देणार आहेस का ? मोठ्या धर्माच्या थापा मारतो आहेस तो !

**तोह०** मेरा वोही इरादा है. मैं तो हम्मेश बम्मन लोगोंको खैरात करता हूं. ए लेवो आपकू ? [ एक मूठभर पैसे हातांत घेतो. ]

**हिक०** ( पुढें हात करून ) तूं खरोखर चांगला मनुष्य आहेस. मुसलमान होऊन बाबा हिंदूंना लाजिवलेंस ! सोड ओंजळ.

**तोह०** फिर पंडितजी ! आपने कायदे से चलो, आप पहिले ज्यो ' ॐ राजाय प्रसवे ' गाते है, वो जरा सुनावो.

**हिक०** अरे ते वेद आहेत. ते म्लेच्छांच्या आणि शूद्रांच्या कानांवर जातां कामा नयेत. ते कसे म्हणूं ?

**तोह०** आपको एक मूठ जादा मिलेंगा—सुनावो.

**हिक०** बरं म्हणतों, पण डोळे मिटून म्हणेन; म्हणजे तुला पाहिलेंच नाहीं असें समजेन. ( डोळे मिटून ' ॐ राजाय राज प्रसवे ' इ० म्हणतो. ) बरं आतां दे पैसे ?

**तोह०** पंडतजी, आप तो बहोत हिकमती है. बेदको कायदा कायदेके सरीखे बराबर तुम पालते है.

हिक० अगोदर दक्षणेस टाक. मग कर बडबड.

तोह० आपको दक्षणा देनेके वास्ते इधर कुछ् जरा पानी है.

हिक० अरे पाणी कशास हवें. पाण्यानें भिजलेल्या पैशास जर मीं हात लावला तर मस विंटाळ होईल. कोरडेच दे.

तोह० मै ऐसा सुना है के पानी बिगर पैसा शुद्ध नही हो सकता. और आप के सरीखे पंडित भी नहीं लेते.

हिक० अहं, तें कांहीं तरी आहे.

तोह० ए लेवो. ( एकच पैसा खालीं टाकतो. )

हिक० ( पैसा घेऊन ) सगळे द्याहो.

तोह० सब पानी बिगर नही मिल सकते.

हिक० असं काय करतां हो, तुह्मी माझे दोस्त आहा.

[ त्याच्या खांद्यावर हात टाकतो. ]

तोह० बम्मनजी ! दूर सरो. आपको विंटाळ होयेगा !

हिक० अरे हरामखोरा ! दक्षणा देत नाहींस का ? थांब, तूंस दाखवितों. ( तोहमताची दाढी धरून ओढतो. दाढी हातांत येते. ) अरेच्या ! अरे हा सोंगाड्या फकीर ! अहो किल्लेदारसाहेब ! अहो किल्लेदारसाहेब ! हा बघा कोणी शत्रूचा हेर फकिराचं सोंग घेऊन आला आहे. धांवा हो धांवा.

[ किल्लेदार यमाजीभास्कर येतो. ]

यमा० काय गडबड आहे ?

हिक० हा पहा एक मनुष्य फकिराचं सोंग घेऊन सगळ्या किल्ल्याभर हिंडून टेहेळणी करीत होता. आपल्या घराभोंवतीं तो येरझारा घालीत होता, तों मीं त्यांस पकडलें.

यमा० ठीक केलंत भटजीमहाराज ! पण–

हिक० कसें ओळखलें हरामखोरास ?

यमा० छान् केलंत !—

हिक० लोकांस फसवीत होतास नाहीं ?

यमा० पण भटजीमहाराज, हा मनुष्य आमचाच आहे.

हिक० म्हणजे ! कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ कीं काय ? घर-भेद्याचं कामच हें.

यमा० तसं कांहीं नाहीं. कांहीं गुन्ह्याचा तपास करण्याकरितां मींच त्याला नेमला होता.

हिक० पण तोच गुन्हा करण्यास प्रवृत्त झाला !

यमा० चालायचंच हें असं. बरं, तुम्हांला आतां त्याची काळजी नको. तोहमतराव ! तुमचं सोंग या एका भटजीमहाराजांनीं उमगावं ना ? बघा आत्तां इथली भिक्षुक मंडळी या भटजींची किती वाहवा करतील ती. तुम्हां आम्हांला तोंड बाहेर काढायला जागा नाहीं ठेवणार. भटजीमहाराज हुषार खरे.

हिक० आहेच तसा मी ! बरं पण आतां दक्षणा ? पण आज दुप्पट दक्षणा मिळाली पाहिजे. एक या कामगिरीबद्दल बक्षीस म्हणून दक्षणा ! दुसरी दक्षणा म्हणून दक्षणा ! आणि शिवाय वर या फकिरानं जमा केलेली ही सगळी दक्षणा !

यमा० ठीक आहे. तोहमतराव ! एक दहा रुपये आणा बरं घरांतून— किंवा घरांतच चला ना ? [ तोहमत घरांत जातो. ]

हिक० नको. इथंच बरं आहे. इथंच होऊं द्या दक्षणा.

[ तोहमतराव रुपये घेऊन येतो. ]

यमा० तोहमतराव ! तुमची फकीरीची कमाई आणा. ( ती घेऊन ) आतां ठीक. भटजीमहाराज ! हे पांच रुपये बक्षिसाचे, आणि हे पांच रुपये दक्षणा. घ्या सर्व आणि द्या आशीर्वाद.

[ यमाजी व तोहमतराव दक्षणा देऊन हिकमताच्या पायांवर डोकीं ठेवतात. हिकमत आपला भटजीचा वेष काढून टाकतो. व गप्प उभा राहतो. ]

यमा० } ( उठून त्याच्याकडे पाहून ) हें कायरे ? भटजीबुवा
तोह० } कुठं आहेत.

हिक० भटजीमहाराज गुप्त होऊन या हिकमतीच्या स्वरूपांत दृश्यमान होत आहेत, जेआहेत्ते.

यमा० हिकमतराव ! कमाल आहे तुमची बुवा ! अहो, मलासुद्धां फसवलंत !

**हिक०** तुम्हांलाच काय? महाराजांजवळूनसुद्धां पांच मोहरा आणल्या! ह्या पहा—या तोहमतावर आपली जास्त कृपा! तोहमत फार हुशार! पण त्याच्या हुशारीचें आज दिवाळं निघालं.

**यमा०** बरं हिकमतराव! तोहमतराव! तुम्ही आंत चला आणि आपल्या काय काय बातम्या आहेत तेवढ्या सांगा. [जातो.]

**हिक०** तोहमतराव! राम राम!

**तोह०** राम राम. [दोघेही जातात.]

---

## प्रवेश दुसरा.

—:०:—

**स्थळः—बाग.**

[तलावाच्या कांठावर मालती बसली असून ती पाण्यांत दाणे टाकीत आहे.]

**माल:—**

**पद १३ वें. राग सिंधुरा, ताल त्रिवट.**

**चमकत लखलख गगन पातालीं। जलज जमुनि**
**विहरत कुसुम गेंद, अवचित लपत जलतालिं**
**या कालीं ॥ धृ० ॥ वरुणदेवि सकल विभव**
**शरिरिं घालि, नटुनि आलि, तिलक चांद सुबक**
**हिरक मौक्तिक भालीं ॥ १ ॥**

(स्वगत) अगबाई! किती भरगच्च हा थवा! जसा कृत्तिकेचा पुंजकाच! एका एका कणाकरितां माशांच्या काय ह्या उड्यांवर उड्या। शुक् शुक्!— मीं शुक् शुक् म्हणतांच सगळे मासे पळून गेले! (पुन्हा दाणे टाकते.) हे पहा, आतां मघांच्याहून जरा मोठे आले हो. लख लख लख लख कशा टिकल्या चमकत आहेत! जसा मोत्यांचा घोसच. शुक् शुक्! (टाळी वाजवून) गेले पळून सगळे! आतां पाहूं केवढाले येतात ते! (पुन्हां दाणे टाकून हे किती तरी मोठे आहेत! दाणे पडायचा अवकाश तो पार! (पुन्हां दाणे

टाकते ) घ्या मेल्यानों पुन्हां !—पार ! पुन्हा घ्या.—पुन्हां पार ! ( माग वळून ) अगबाई ! हे दाणे कुणीं उडवले ? हं ! या मेल्या पांखरानं वाटतं ! बघा कसा डौलानं फांदीवर बसला आहे. जसा सावच. कायरे मेल्या, तुझ्या-करितां दाणे ठेवले आहेत वाटतं ?—या माशांकरतां आहेत हो. बघ, आतां पुन्हां चोमडेपणा करशील तर ! ( पुन्हां पाण्यांत दाणे टाकते. ) या दाण्यांच्या लालुचीनं कोळ्याच्या गळाला मासा बळी पडतो. माशानों ! या-या. हे तुम्हांला लालूच दाखविण्याकरितां मी टाकीत नाहीं आणि तुम्हांला पकडा-यला माझ्या हातांत गळही नाहीं. ( दाणे टाकते ) या, अगदीं भिऊं नका !

[ जयवंतराव येतो. ]

**जय०** आलों—अगदीं भीत नाहीं. कां ! दचकलांतशा ? माशाला पाहून कोळी दचकला हें नवलच म्हणायचं !

**माल०** वाः ! कुणी दचकणारच नाहीं जसं. ध्यानीं नाहीं, स्वप्नीं नाहीं, अशा वेळीं अवचित जर एकादा ओळखीचा आवाज ऐकूं आला तर कुणी चपापायचं नाहीं वाटतं ?

**जय०** हं ! हें तरी आम्हाला कळलं, कीं आम्ही तुमच्या ध्यानींही नाहीं आणि स्वप्नींही नाहीं.

**माल०** असं कुठं मीं म्हटलं ?—कायगबाई ? या माशांनासुद्धां जें कळतं तें कांहीं कांहीं माणसांना कळत नाहीं.

**जय०** म्हणजे आपली भाषा माशांना कळते वाटतं ?

**माल०** म्हणजे ! यांत काय संशय ! माझी भाषा माशांना कळत अस-ल्यावांचून का मी माशांशीं बोलत होतें ? मासेच काय, पण या बागेंतलीं फुलं, हीं पाखरं, हे कारंजाचे तुषार यांनासुद्धां माझी भाषा कळते हो. आतां कळलं का ?

**जय०** कळलं ! प्रेमाची भाषा कळायला प्रेमीच बनावं लागतं. जरी माझे पाय त्या भेसूर रणभूमीवरून या प्रेमळ प्रेमभूमींत आले, तरी माझं मन अद्याप मागंच रेंगाळत आहे कीं काय ? प्रेमाच्या भूमींतून कांहीं काळ युद्धाच्या प्रदेशांत गेल्यामुळं प्रेमाची भाषा कळण्याच्या बुद्धीवर गंज का कुठं चढतो ? मग ही भाषा मला कां कळली नाहीं बरं ?

**माल०** पण आतां तरी कळायला लागली ना ?

**जय०** आतां अगदीं भराभर कळायला लागली ! मुळींच अडत नाह एकसुद्धां कठिण शब्द लागत नाहीं.

**माल०** व्याकरण बिकरण ?

**जय०** सगळं तोंडपाठ आहे. पुढचा धडा देतां का ?

**माल०** कोण मी ? वाः ! अजून कांहीं शिकायचं राहिलं आहे वाट ?

**जय०** शिकायचं राहिलं नाहीं, मग परीक्षा उतरल्याबद्दल सन देऊनही फुलफळांनीं भरलेला आपला सौंदर्याचा बगीचा आमच्य स्वाधीन करा.

**माल०** हा बगीचा नाहीं. हें एक रानांतलं काटेरी जाळवंड आहे !

**जय०** मालती ! हें सौंदर्याचं जाळं माझ्या मनोवृत्तींना गुरफटीत आह आणि त्याही मोठ्या आनंदानं त्या जाळ्यामध्यें गुरफटून जात आहेत.

### पद १४ वें. राग सारंग ताल धम्मार.

**प्रेमळ मन पळभर आज घेत वनविहार ॥**
**तरल वेलि सुमन भालिं ये कैसी त्यासमोर ॥ धृ० ॥**
**पुष्पाचा सहज स्पर्श । हृदयातें आकर्षित । मधुर**
**गंध भ्रमवि चित्त । नपरत ये मन बाहिर ॥ १ ॥**

**माल०** तें राहू द्या मेलं ! पण मला अगोदर असं सांगायचं, आपण लढाईवर गेलां होतां, तेव्हां माझ्याकरितां कांहीं आणलं आहे कीं नाहीं ? का आपले हात हालवीत परत आलां ?

**जय०** हात हालवीत कसा परत येईन ! तुला जें पाहिजे तें तुझ्याकरितां आणलं आहे.

**माल०** काय आणलं आहे, दाखवा पाहू ? दाखवा—दाखवा लौकर.

**जय०** दाखवायचं काय ? जयश्री का कुठं दाखवतां येते ? मालती ! हा जयश्रीचा नजराणा मीं तुझ्या चरणांपाशीं ठेवण्याकरितां आणला आहे. त्याचा स्वीकार कर आणि या दासाला त्याच्या कामगिरीबद्दल योग्य बक्षिस दे.

**माल०** बक्षिस द्यायला माझी ना का आहे ? पण असं उगीच

बक्षिस कसं द्यायचं बाई? वल्लभानं आपल्या प्रियतमेपुढं जयश्रीची पायघडी घालायची, हें ठीक! त्या पायघडीवरून प्रियतमेनं मोठ्या डौलानं चालायचं, हें ठीक! पण त्या अदृश्य जयश्रीला आपण शत्रूकडून जिंकून आणलं, तेव्हां आपल्या अंगावर तिनं कांहीं, अलंकार चढवले असतीलच; चढवले आहेत का?

**जय०** हो.--हो. माझ्या अंगावर या लढाईत कांहीं ठळकच अलंकार पडले आहेत. प्रियतमेला सद्गुणांचे अलंकार जितकी शोभा देतात तितकेच वल्लभाला शौर्याचे अलंकार शोभतात. मालती! माझ्या अंगावरचे जखमांचे अलंकार पाहण्याची तुझी इच्छा आहे काय?

## पद १५ वें. राग पहाडी, ताल तक्का.

**दावितो हे वार दुर्धर। दिव्य शोभा वीर-तनुवर।**
**रक्तचंदन अंगभर। आलंकृता तनु कंठ पद्कर॥**
**॥ ध्रु० ॥ वार कंठिं हार चमकत। बहू घात**
**भूषित। रुधिर-गंगा चरणिं धांवत। शिरीं पडुनी**
**तीर तोमर॥ १॥**

**माल** खरंच, आपल्या जखमा फार खोल नाहींत ना?

**जय०** विशेष खोल नाहींत. रणांगणावर शत्रूच्या तरवारींनं केलेल्या सर्व जखमा तुझ्या नेत्रकटाक्षानं माझ्या हृदयाला केलेल्या जखमेइतक्या कांहीं खोल नाहींत. मालती! मी आपल्या हृदयाची जखम तुला दाखवूं का? ती अजून ताजी आहे! तूं पहातेस का?

**माल०** नकोगडे!

**जय०** नको कां? पहा पहा! तूं तिच्यावर नजर टाकलीस म्हणजे तुझ्या दृष्टीच्या जादूनं ती जखम भरून येईल. आणि तुझ्या हस्ताच्या स्पर्शानें तिच्या वेदनाही नाहींशा होतील!

**माल०** कांहींतरीच बाई बोलायचं! तें राहूंद्या गडे! पण महाराजांनीं आपल्याला कोणत्या शत्रूवर पाठविलं होतं? आपण शत्रूला कसं चीत केलंत? आपण त्याला धरून आणलं का सोडून दिलं? आम्हांला कांहींच सांगायचं

नाहीं ना ? आम्ही पडलों आडरानांत ! आमचं कोण आहे एवढं अगत्यानं येऊन आम्हांला सांगायला ?

**जय०** नका आतां आमची जास्त उडवूं ! मी अगोदर आलों नाहीं म्हणून वाटतं हे टोमणे ? होय ना ? पण तूंच पहा ! मी महाराजांचा ताबेदार त्यांच्या कामगिरीवर गेलेला ! तेव्हां अगोदर त्यांच्या दर्शनाला नको का जायला ? त्यांचं दर्शन घेतलं तेव्हां बरीच रात्र झाली आणि माझ्या जखमा बांधण्यांत बाकीची सगळी रात्र गेली ! सकाळीं कालच्या थकव्यानं जरा जास्त वेळ झोंप लागली. पण जागा झाल्याबरोबर रिकीबींत पाय ठेवून घोडा उडविला, तो प्रथम तुझ्या दर्शनालाच आलों.

**माल०** असं का ? मग गडे मी उगीच बोललें, कांहीं तरी बडबडलें ! क्षमा करायची ना मला ?

**जय०** यांत कसली बुवा क्षमा करायची ? पण आपण क्षमा मागतांच आहां तर करूं. पण आमची एक अट आहे, ती पुरी केली पाहिजे.

**माल०** अशी काय अट आहे ती सांगा तर पाहूं. पुरी होण्यासारखी असेल तर होईल पुरी ! पण—

**जय०** पण काय ? एकदां या बाहूंच्या हातकड्यांनीं आम्हाला बांधून टाकायचं आणि या पोंवळ्याच्या ओठाचं कुलूप घालून आमचं तोंड बंद करायचं !

**माल०** इश्श ! तेंच मी म्हणत होतें, पण म्हणून !—पण आपण काय नेमकीच अट घातली. आम्ही नाहीं असल्या अटी कबूल करणार जा.

पद १६ वें. राग जिल्हा, खमाज ताल त्रिवट.

**वा: मानु कैसी मी, लहर तरी ऐसी ॥ विनय रहित**
**वच विकारी वच सुखकारी । हृदयिं खंति नच**
**कैसी ॥ धृ० ॥ जलद रमवि चपला परि नय**
**धरी । अनुचित रव जरी करित तरिच दूरी ।**
**सरत चपल गति ऐसी ॥ १ ॥**

**जय०** ठीक आहे ! मग मीही जातों परत. घोडा आहे तयार जीन घालून.

**माल०** आपण खूप जायला निघाल पण मी बरी सोडीन. मी जशी कांहीं कुणीच नाहीं वाटतं ?

**जय०** कुणीच नाहीं कशी ? या जयवंतरावाच्या हृदयावर सत्ता चालविणारी सम्राज्ञी तूं आहेस. त्याच्या वीरश्रीला उत्तेजन देणारी देवता तूंच आहेस. त्याच्या आयुष्याला वळण देणारी यक्षिणीही तूंच आहेस.

**माल०** पुरे झाली स्तुती हं ! असंच गोड गोड बोलून गरीब बिचाऱ्या माशाला जाळ्यांत अडकवायचं !

**जय०** मग माझी अट ?

**माल०** काय करायचं ! मग हं—

**जय०** हं ?—

[ दोघे आलिंगन देतात तोंच सुभान्या येतो. जयवंतराव व मालती दूर होतात. ]

**माल०** कायरे सुभान्या ! काय खबर आहे ? कांहीं निरोपबिरोप आणला आहेस वाटतं ?

**जय०** निरोप आणायला हाच मुहूर्त सांपडला वाटतं ?

**सुभा०** ताईसाहेब ! ह्ये पतुर दिलं हाय बाईसायबांनीं. [ पत्र देतो. ]

**माल०** होय का ! ( पत्र फोडते ) बरं, सगळीं माणसें खुशाल आहेत ना ? [ पत्र वाचते. ]

**जय०** ( स्वगत ) पत्र वाचतांना हिची मुद्रा पालटत कां चालली आहे ? हिच्या नाकांतून सुस्कारे कां सुटत आहेत ? हिचं हृदय भरून कां येत आहे ! ते पहा, नेत्रसुद्धां पाण्यानं डबडबून गेले ! या पत्रांत असं आहे तरी काय ?

**माल०** सुभान्या ! तूं वाड्यांत जा आणि जमादाराला घोडी जीन घालून तयार करून ठेवायला सांग. मी इतक्यांत येतेंच.

**सुभा०** जी ताईसाब ! पण आपुन जरा आवरतं घ्या.

[ जातो. ]

**जय०** काय त्या पत्रांत आहे ? ही घोडी तयार करण्याची गडबड आणि हें आहे काय ?

**माल०** काय असायचं ? नशीब !

**जय०** तरी पण मला सांगण्यासारखं नाहीं का ? तुझ्या दुःखाचं कारण तूं मला सांगूं नयेस का ? तुझं दुःख दूर करण्याचं सामर्थ्य माझ्या अंगांत नाहीं का ?

**माल०** आपण मनांत आणाल तर खरोखरच माझ्या मनाचं दुःख दूर करूं शकाल !

**जय०** मग बेलाशक सांग. तुझं दुःख दूर केलं नाहीं, तर भोंसल्याच्या घराण्याचं नांव सांगणार नाहीं !

**माल०** अगदीं शपथ ?

**जय०** शपथ.

**माल०** तर मग वाचा हें. [ पत्र देते. ]

**जय०** ( पत्र वाचून ) अरेरे !–[ विचार करीत स्तब्ध बसतो. ]

**माल०** कां ? आपल्या हातून नाहीं का होण्यासारखं ?–कां बोलत कां नाहीं ?

**जय०** नाहीं, मी जरा चुचकळ्यांत पडलों आहें. जगदेवरावांची बायको चंद्रावती तुझी बहीण; या गोष्टीचं मला कसं विस्मरण पडलं कोण जाणे !

**माल०** खरंच ! खरोखरच का ?

**जय०** माझ्या मनांतून तुला एक प्रश्न विचारायचा आहे. विचारूं कां ?

**माल०** बेलाशक विचारा.

**जय०** जगदेवरावाला पकडणाऱ्या पुरुषाला तूं काय म्हणशील ?

**माल०** त्याला मी अतिशय शूर आणि तसाच धाडशी वीर समजेन.

**जय०** मग तो दुर्दैवी प्राणी मीच आहें.

**माल०** कोण तुम्हीं ?

**जय०** होय. आणि म्हणूनच जी गोष्ट मान वर करून मी तुला सांगणार होतों, तीच मान खालीं घालून सांगण्याचा प्रसंग माझ्यावर आला आहे. मालती ! कालच्या स्वारींत, मीं जय मिळविला तो जगदेवरावावरच ! ही दंडावरची जखम त्याच्याच हातची ! हा छातीवरचा घाव त्याच्याच तरवारी-

चा ! हा मांडीवरचा वार त्याच्याच समशेरीचा ! आणि ही पायावरची चाटहि त्याच्याच फटकाऱ्याची ! माझ्या कीर्तीला कारण जगदेव आणि माझ्या अपकीर्तीलाही कारण जगदेवच !

**माल०** असं कां म्हणतां ?

**जय०** तुझं दुःख दूर करीन तरच भोंसल्यांच्या घराण्याचं नांव सांगेन, असं मीं तुला वचन दिलं आहे आणि हें करणं म्हणजे जगदेवरावांना सोडवून त्यांची आणि त्यांच्या बायकापोरांची भेट करणं ! आणि जगदेवराव तर सुटणं अशक्य आहे.

**माल०** आपणच केलेली गोष्ट आपल्याला निस्तरतां येत नाहीं ?

**जय०** मी पुष्कळ निस्तरायला पाहीन. पण मला निस्तरतां आली पाहिजेना ? ही गोष्ट सर्वस्वी जगदेवरावांच्या हातची आहे. त्यांनीं विजापूरचा पक्ष सोडावा आणि महाराजांना मिळून आपलं कल्याण करून घ्यावं.

**माल०** तें कांहीं नाहीं. जगदेवराव उद्यां संध्याकाळपर्यंत आपल्या बायकापोरांत जर मला दिसले नाहींत तर ही मालती आपल्याला अंतरलीच म्हणून समजा. मी आपल्या वचनांतून आपणाला मोकळं करतें.

**जय०** पण मी मोकळा होईन तर ना ? मालती ! ऐक—

**पद १७ वें. राग गरुडध्वनी, ताल दादरा.**

**तिळभर सुख नच मजला, मुकलों जरि तुजला ॥**
**अढळपदीं ने रमणी तरिच भाग्य वीराला ॥ धृ० ॥**
**सोडवीन जगदेवा, जोंवरि रवि येत नवा ।**
**न तरि असो त्या वरिला, मरण मला ॥ १ ॥**

[ जयवंतराव जातो. ]

**माल०** अगबाई ! हे निघून गेले !–ते पहा, घोड्यावर स्वार झाले ! तो पहा घोडा चौखुरी सोडला !–त्यांचा शूरपणा, त्यांचं धाडस, त्यांनाच शोभूं जाणं !–गेले, गेले ! पार गेले ! दृष्टीआड झाले ! आतां कसलं जेवण अन् कसलं खाणं ! काय जिवाचा आटापिट करतील कांहीं सांगवत नाहीं. जयवंतराव ! आपल्या शब्दाप्रमाणं उद्यां सूर्योदयाच्या आंत जगदेवराव कैदेंतून सुटले आणि उद्यां सूर्यास्ताच्या आंत विश्वासाची, ताईची आणि त्यांची भेट झाली

तर ही मालती तुमची दासी होऊन तुमच्यावरून आपला जीव ओंवाळून टाकील.

पद १८ वें. राग बागेश्री, ताल झपताल.

दिव्य वीरांगना जरि सफल पतिवचन । सततही
पदीं दासी तन्मयचि विजय धन ॥ धृ० ॥
प्रेमांत प्रद्युम्न, समरांत द्रौणी. औदार्यि तो कर्ण ॥
तळपत रविकर सम प्रखरतर पति सुगुण ॥ १ ॥

[जाते.]

---

## प्रवेश तिसरा.

—:०:—

स्थळः—तुरुंगाच्या समोरील पहारा.

[ तोहमतराव शिपायाच्या वेषांत पहारा करीत आहे, हिकमत बैराग्याच्या वेषांत येतो. ]

**हिक०** ( स्वगत ) जगदेवरावाची मोहीम आटपली, कीं चार दिवस विसावा मिळेल असं वाटलं होतं. पण जगदेवरावाला पकडून त्याला किल्ल्यावर कैदखान्यांत ठेवल्यापासूनच खऱ्या कामाला सुरुवात झाली. जगदेवराव फार प्रसिद्ध पुरुष असल्यामुळं त्याच्याबद्दल लोक काय म्हणतात, याची चौकशी निरनिराळे वेष घेऊन दिवसां करायची आणि रात्रीं या बैराग्याच्या वेषांत तुरुंगाच्या आसपास टेहेळणी करायची! सकाळीं तोहमतरावाची फजिती झाल्यामुळं आज ते अगदीं तोंड लपवून आहेत. हा पहारेकरी पहारा करतो आहे, त्याची जरा गम्मत करूं या. [ खांकरतो. ]

**तोह०** कोन हाय ! बोल, न्हाइ तर घालतो गोळी !

[ बंदूक रोखतो. ]

**हिक०** मै तो एक बैरागी हूं. दत्तनिरंजनका भक्त हूं. आप गोळी उडा देवो, मेरे शरीरको तो बिलकुल इजा न होयेगी.

तोह० अर गोसावड्या ! बऱ्या बोलानं जा हतून. न्हाइतर--देवाच्यान गोळी घालीन.

हिक० तुम तो बहोत दयाशील-धर्मशील आदमी है. तुमारे हातसे मेरेपर गोली न छुट जाती है. भैय्या ! तेरा नशीब तो बहोत अच्छा है. मैं तुमको तुमारा प्राक्तन कह देता हूं ! जरा तुमारा हात तो हमारे हातमे देवो.

तोह० पन या काळोकामंदी तुला माझ्या हातावरच्या ऱ्येगा दिसनारबी न्हाईत.

हिक० मेरेको तो दिव्यदृष्टि है. मै सब भूतभाविष्य जानता हूं. हात तो दे देवो.

तोह० ह्यो घ्ये हात. पन बगू. [ हात देतो. ]

हिक० ( हात पाहून ) तुमको माता है. है या नहीं ?

तोह० हाय बगा.

हिक० पिताभी है.

तोह० व्हता, पन त्यो मरून लई दिस झाल बगा !

हिक० उसमे कुछ नहीं. तुमको माता है. उसमे अंदेशा नहीं. और तुमको पिता था, उसमेभी कुछ शंका नहीं. मातापिताबिगर तुम तो नहीं आये इस जगमे ?

तोह० बराबर हाय.

हिक० तुमको हातभी है. पांवभी है. शिरभी है. और कानभी है.

तोह० ह्ये समद बराबर हाय. पन म्होरं सांगा.

हिक० मेरे नजरको तो ऐसे आते है के तुम तो बडा आदमी है. और ये पहारेकरीका कामभी तुमारा नहीं है. तुम तो हेर है.

तोह० बरं, म्होरं ह्ये समदं वळाकलं बगा.

हिक० यह तुम बोलते है यह भाषाभी तुमारी जनमकी भाषा नहीं है. तुम शुद्ध भाषासे बात करो. तुम यह पहारेकरी का सोंग लाया है और तुमारा नामभी तोहमतराव है ! है या नहीं ?

तोह० ( त्याचे पाय धरून ) तुम्ही खरं ओळखलंत. तुम्ही अलौ-

केक पुरुष आहां. तेव्हां तुमच्याजवळ आतां कांहीं लपवून ठेवीत नाहीं. या तुरुंगांत एक मोठा कैदी आहे. तेव्हां रात्रीचा दगा वगैरे कांहीं होऊं नये, म्हणून वेष बदलून आम्हां हेरांना किल्लेदारसाहेब पहाऱ्यावर मुद्दाम नेमतात.

हिक० अच्छा ! और सुनो. तुमको दोचार दिनमें बढती मिलेगी. और तुमारा एक दुष्मन है. उसका नाम हिकमत ऐसा है. वोही ये चार दिन पीछे मरजाता है. अच्छा है या नहीं ?

तोह० बरं आहे कीं ! एक मेल्याशिवाय दुसऱ्याला थोडीच बढती मिळायची आहे ?

हिक० ( स्वगत ) अरे चोरा ! ( उघड ) तुमको तुमारा भविष्य तुमारे आखोंसे देखनेका इरादा है ? यह अंजन देखो. यह तुमारे आखोंमें मैं हातसे लगा देताहूं. एक दोचार पलमें तुमको सामने तुमारा सब भविष्य चारित्र आ जायेंगा.

तोह० वाः ! पाहूं ! पाहूं ! घाला डोळ्यांत.

हिक० ( अंजन भरून ) दुनियेमे जो कुछ गुप्त धन और कुबेरकी संपत्ति है, वोही दिखलानेकी ताकद यह अंजनमें है. मत घबरो.

तोह० अहो बोवाजी ! अहो, आग होते कीं डोळ्यांची. छे–छे–छे–छे ! जीव अगदीं घाबरून चालला वघा !

हिक० जरा दम धरो. घाबरो मत. देवो आपने दो हात मेरे हात में दे देवो. [ त्याचे हात दोरीनें बांधतो. ]

तोह० अहो बोवाजी ! हें काय करतां ? माझे हातसे बांधतां ?

हिक० कुछ नहीं. गडबड मत करना. नहीं तो यह बंदुक लेकर गोली उडा देता हूं ! [ बंदुक मस्तकाला टेंकतो. ]

तोह० अरे दगा ! दगा ! मी तुमच्या पायां पडतों.

हिक० का तोहमतराव ! हाच का आपला पहारा ! वाः ! खूप आहे.

तोह० कोण हिकमतराव ! वाः ! ही कायहो थट्टा ! माझे डोळे कायमचे गेले की !

हिक० थट्टा कसली ! काम करण्याची अक्कल नाहीं तर घरीं स्वस्थ

बसावं. या हिकमतीच्या मरणाची वाट पहातां नाहीं? आंत जगदेवासारखा कैदी! फंदफितुर व्हायचा घडोघडीं संभव! आणि तुम्ही आपले एकादा गोसावी आला, कीं आपली अक्कल पाघळीत बसतां! चांगला करतां पहारा.

**तोह०** पण आतां माझ्या डोळ्यांची वाट काय ?

**हिक०** त्याची काळजी करूं नका. दोन घटका जरा आग होईल, मग वाटेल गार.

**तोह०** आपल्याच्यानं कांहीं आतां पहारा होणार नाहीं.

**हिक०** आणि पहारा करून तरी काय ध्वज लाविले असतेत, ते दिसलेंच की! मी आपल्यांतलाच पडलों म्हणून! पण समजा, जगदेवाला सोडवायला जर त्याचा एकादा मित्र असंच सोंग घेऊन आला असता आणि त्यानं तुम्हांला असंच करून जगदेवाला पळवला असता, तर तुमची—आमची—किल्लेदारसाहेबांची—सगळ्यांचीच गर्दन जातीना!

**तोह०** खरं आहे, माफ करा.

**हिक०** आतां असं करा; आस्ते आस्ते घरीं जाऊन स्वस्थ झोंप घ्या. मी करतों पहारा!

**तोह०** पण किल्लेदारसाहेबांना—

**हिक०** त्यांना मी सांगेन कांहींतरी. त्याची नको तुम्हांला काळजी! जा तुम्ही! (हिकमत पहारेकरी बनतो, तोहमत जातो.) आज सकाळपासून केती तरी सोंगं झालीं! भिक्षुकीवरून शिपायीगिरीवर आलों की! खरे खरे भिक्षुक कधीं शिपायी होतील का? बरं शिपाई झाले, तरी त्यांचं 'ॐ भवति भिक्षां देहि' सुटेल का? छत, तें कसं सुटणार! अरे पण हा कोण येतो आहे?

[ जयवंतराव येतो.

**जय०** (स्वगत) कांहीं झालं तरी आज जगदेवरावांची सुटका केल्यावांचून मी रहात नाहीं. महाराजांनीं माझी विनंति अमान्य करावी अं! मीं स्वतः जगदेवरावांना पकडलं, ही गोष्ट महाराजांनीं लक्षांत घ्यायला हवी होती! पण मी महाराजांना तरी दोष कसा देऊं? त्यांच्या माथ्यावर राष्ट्रकार्याची केवढी जबरदस्त जबाबदारी आहे! त्यांचीं धोरणं काय आहेत तीं

माझ्यासारख्याला काय कळणार ? मालती ! तुझ्या प्रेमापुढं मला कांहींही दिसत नाहीं! मान, कीर्ति, वैभव हीं सारीं तुझ्या प्रेमाच्या अभावीं मला असून नसून सारखींच आहेत. तूं आहेस तरच मला सर्व कांहीं आहे. इतर सगळं जग तुच्छ आहे—हा पहारेकरी माझ्याकडे रोखून पहातो आहे. त्याला विचारावं !—काय नाईक !

**हिक०** ( स्वगत ) जयवंतरावच. ( उघड ) कोण आहे इथून एकदम जा. नाहीं तर मला कायद्याप्रमाणं गोळी झाडावी लागेल जातां कीं नाहीं इथून ?

**जय०** जात नाहीं. पण इतके हातघाईवर येऊं नका. मी कोण आहें, तुम्हीं ओळखलंत का मला ?

**हिक०** या रात्रीच्या वेळीं आम्ही पहारेकरी प्रत्यक्ष महाराज आले तरी त्यांनाही ओळखीत नाहीं.

**जय०** महाराज आले तर न ओळखण्याच्या गप्पा राहूं द्या. त्या सगळ्या बोलण्याच्या गोष्टी आहेत. हें पहा, जयवंतराव भोसले म्हणतात तो मीच ! मला जगदेवरावांना भेटायचं आहे. मींच त्यांना पकडून आणलं हें तुम्हीं ऐकलंच असेल.

**हिक०** तें मला सगळं ठाऊक आहे. पण तुम्हांला जगदेवरावाला आतां भेटतां यायचं नाहीं. ही रात्रीची वेळ आहे. उद्यां सकाळीं किल्लेदारांचा लेखी हुकूम आणा आणि मग भेटा.

**जय०** नाहीं; मला मेहेरबानी करून आतां भेटूं द्या. एका अर्ध्या घटकेंत परत येतों. हा घ्या मोत्याचा कंठा बक्षीस.

**हिक०** प्राण गेला तरी घेणार नाहीं आणि तुम्हांलाही आंत जाऊं देणार नाहीं.

**जय०** हं ! आणि मीही सांगतों, मी गेल्यावांचून राहणार नाहीं. हा पहा चाललों.

**हिक०** मागं व्हा. नाहीं तर मराल. [ बंदूक रोखतो.

**जय०** अस्सं काय ? ( एकदम झडप घालून बंदूक धरून त्याला खालीं पाडतो व बंदूक हिसकावून त्याला दोन ठोसे मारतो. ) मर—मर—मर !—खरो

खरच मेला ! मरूं द्या. माझा इलाज नाहीं. जें जें करीन म्हणून मी एकदां वाचेनं बोललों तें करण्याकरितां खुनांची लाखोली वहावी लागली तरी हरकत नाहीं. प्रेमदेवता प्रसन्न करण्याकरितां रक्ताचा अर्घ्य द्यावा लागला तरी पर्वा नाहीं ! महाराजांच्या या एका इमानी नोकराचा मीं प्राण घेतला याबद्दल महाराजांनीं मला हद्दपारीची शिक्षा दिली तरी हरकत नाहीं. पण मालती ! तुला दिलेलं वचन मोडून तुझ्या प्रेमाच्या राज्यांत हद्दपारीची शिक्षा झालेली मला सहन होणार नाहीं. हा पहा, एकदम आंत जाऊन जगदेवरावांची मुक्तता करतों. [ जातो. ]

**हिंक॰** ( तो गेला असें पाहून कण्हत उठतो ) अरे बापरे ? मेल्याचं सोंग केलं म्हणून वांचलों. नाहींतर खरोखरीच मेलों असतों ! तोहमतरावाची थट्टा करून त्याच्यावर उपकार करायला गेलों, त्याचं हें प्रायश्चित्त ! अगोदर किल्लेदारसाहेबांकडं धांवत जाऊन त्यांना ही बातमी सांगूं द्या.

[ जातो. ]

---

# प्रवेश चौथा.

—:०:—

## स्थळः—तुरुंग.

**जग॰** ( एकदम झोपेंतून उठून ) काय ? चंद्रावती कुठं आहे ? माझा बाळ विश्वास कुठं आहे ? माझीं चाकरमाणसं कुठं आहेत–अरे ! हा कैदखाना ! आणि मला पडलेलें तें स्वप्नच !–क्षणभर मी किती आनंदांत होतो. मला वाटलं मी, चंद्रावती, बाळ आनंदानं गोड गोड गोष्टी बोलत बसलों आहोंत, इतक्यांत मला कुणी 'जगदेवराव' म्हणून हांक मारली !—पण ती स्वप्नांतलीच हांक !—देवा ! तूं मनुष्याला स्वप्नसृष्टीचा क्षणमात्र आनंद देतोस खरा, पण त्या आनंदानं जागृतावस्थेतलं दुःख मात्र जास्त प्रखर भासूं लागतं. माझ्यावर जर तुझी थोडी तरी कृपा असेल, तर मला घोर निद्रा दे. कुंभकर्णाची किंवा सार्वभौम मुचकुंद राजाची निद्रा मला दे आणि तींत

पुन्हां स्वप्न मात्र मला पाडूं नकोस. ( पुन्हां चौथऱ्यावर जाऊन पडतो. जयवंतराव येतो. )

**जय०** जगदेवराव ! जगदेवराव ! उठा उठा !

**जग०** मला पुन्हां स्वप्न पडूं लागलं वाटतं ? मला " जगदेवराव जगदेवराव " अशा हांका मारून " उठा उठा " म्हणून कुणी उठवतं आहे.

**जय०** जगदेवराव ! जागे व्हा—जागे व्हा ! उठा--उठा लौकर !

**जग०** ( उठून ) अजून मी स्वप्नांत नाहींना ?—नाहीं. मी खरोखरच जागा आहे. कोण आहे ? मला कुणीं हांक मारली ?

**जय०** जगदेवराव ! चला, जलदी करा. इथून एकदम निघून चला. हा डगला घाला आणि एकदम घरचा रस्ता धरा. जा, आपल्या बायकापोरांत जाऊन पडा.

**जग०** मी खास स्वप्नांत आहें.

**जय०** तुम्हीं स्वप्नांत नाहीं, जागे आहां. पण या जागेपणांतून जागे व्हा आणि माझ्या विनंतीकडे लक्ष द्या. मी तुम्हांला हात जोडतों. तुम्हीं इथून एकदम घरीं निघून जा. चला, जलदी करा. एक क्षणसुद्धां गमावूं नका.

**जग०** मला एवढं गयावया करून सांगणारा तूं कोण आहेस !—हो, मीं आतां तुला ओळखलं ! मला बंदिवान् करून आणणारा शूर पुरुष तूंच ना ?—होय तूंच ! मग तूं मला आतां घरीं जा म्हणून कसा सांगतोस ? तूं मला पकडून आणलंस आणि तूंच मला सोडून देतोस ? याचं कारण ?

**जय०** कारण सांगण्याची ही वेळ नाहीं. तुमच्या घरच्या माणसांना तुम्ही केव्हां भेटाल असं झालं आहे. बाहेरचा पाहरेकरी मरून पडला आहे. पळा, एकदम पळा ! तुम्हांला कोणीही आडकाठी करणार नाहीं. चला-लौकर. आपले प्राण वांचवा !

**जग०** तूं आपल्या धन्याशीं बेमान होऊन मला इथून पळवून लावतो आहेस ? मी इथून मुळींच जाणार नाहीं. माझ्या मनांत तुझ्याबद्दल असलेला



तोह्मतः—कोण हिकमतराव ! वाः ! ही कायहो थट्टा ! [पृ. ४६

आदर मात्र पार नाहींसा झाला. तुझ्यासारख्या निमकहरामाचे उपकार शिरावर घेऊन प्राण वांचवण्यापेक्षां मेलेलं काय वाईट ! छेः ! छेः !

**जय०** जगदेवराव ! मी आपल्या धन्यार्शी बेमानही झालों नाहीं आणि मी आपल्यावर उपकारांचं ओझंही लादीत नाहीं. माझं कर्तव्य मी करतों आहें. मी तुमच्याबद्दल स्वतः इथं राहून, होईल ती शिक्षा भोगायला तयार आहे. उपदेश करण्याची आणि ऐकण्याची ही वेळ नाहीं. चला जा लौकर. ( चाहूल ऐकूं येते. ) झाला, घात झाला ! ही पहा चाहूल ऐकूं येते आहे. हा किल्लेदार आलाच शिपाई घेऊन.

[ यमाजीभास्कर व कांहीं शिपाई येतात. ]

**यमा०** पकडा या हरामखोराला.

**जय०** यमाजी ! तोंड संभाळून बोला. मला हरामखोर म्हणायला तुम्हांला काय अधिकार आहे ?

**यमा०** हरामखोर नाहीं तर काय ? फितूर होऊन पहारेकऱ्याला ठार करून शत्रूला सोडवण्याची खटपट करणारा हरामखोर नाहीं तर काय ? हा जगदेव आज इथून पळाला असता, कीं महाराजांनीं आमची गर्दन ठेवली असती का ? या यमाजी भास्कराचा उद्यां कडेलोट झाला असताना ? बांधारे याच्या मुसक्या !

**जय०** हं खबरदार ! यमाजी ! मुसक्या बांधायचं कांहीं कारण नाहीं. तुम्हांला मला काय शिक्षा करायची असेल ती करा.

**यमा०** तर मग अगोदर याचं डोकं उडवा.

**जग०** किल्लेदार ! या धाडसी वीराचं डोकं उडविण्याऐवजीं माझं डोकं उडवा. तो फितूर असो कीं बेमान असो, माझ्याकरतां जो आपली गर्दन द्यायला तयार झाला त्याच्याकरतां मला गर्दन दिलीच पाहिजे. माझं डोकं उडवा !

**यमा०** चल हट मागं ! ए फितूर ! चल हो पुढं. आणखी देवाचं नांव घ्यायचं नसलं तर मालतीचं नांव घे ! हो पुढं !

**जय०** हरामखोर ! खबरदार मालतीच्या पवित्र नांवाला आपल्या मुखानं विटाळशील तर. मालती ! मालती ! माझ्या हातून कामगिरी झाली

नाहीं, याबद्दल क्षमा कर ! यमाजी भास्कर ! करा आपल्या दूतांना हुकूम आपले पाश टाकायला.

**यमा०** हरामखोरा ! बडबड किती करतोस ? शिपाईहो ! उडवा याची गर्दन.

[ जयवंताचें डोकें उडवणार तोंच शिवाजी येतो. ]

**शिवा०** हं सबूर ! जयवंतराव ! तुम्हीं हें धाडस करून आमचा भयंकर गुन्हा केला आहे, तुम्हांला कबूल आहे ?

**जय०** होय सरकार.

**शिवा०** आज संध्याकाळीं तुम्हीं माझ्याकडे जगदेवरावांबद्दल रदबदली करायला आलां होतां, त्या वेळीं मीं तुमची विनंति अमान्य केली होय ना ?

**जय०** होय सरकार.

**शिवा०** मग माझ्या मर्जीविरुद्ध हें बेकायदेशीर कृत्य करायला तुम्हीं कां तयार झालां ?—बोला !

**यमा०** बोल बोल, वाचा गेली कीं काय ?

**शिवा०** हं ! यमाजी गप्प बसा. जयवंतराव ! तुम्हीं माझ्या प्रश्नाचें उत्तर कां देत नाहीं ?

**जय०** या प्रश्नाचं उत्तर मला देतां येत नाहीं. पण मी एवढं स्पष्ट सांगतों कीं, या माझ्या कृत्याच्या मुळाशीं एकादं राजकीय कारस्थान किंवा फंदफितुरी नाही आणि याबद्दल वाटेल ती शपथ घ्यायला माझी-ना नाहीं.

**शिवा०** शूराच्या शब्दाला शपथेची जरूरीच नाहीं आणि ज्याअर्थी जगदेवरावांना बंधमुक्त करण्याचं कारण उघडपणानं तुम्हीं सांगत नाहीं त्याअर्थी मीही त्यांत जास्त खोल जाऊं इच्छित नाहीं. जयवंतराव! तुम्हीं अद्याप तरुण आहां. या वयांत तुमच्यासारख्याच्या मनावर विचारापेक्षां विकाराचाच पगडा जास्त असतो; आणि म्हणूनच कोणतीही गोष्ट विचारानं करण्याची तुम्हांला सवय नसतं. जगदेवरावांना बंधमुक्त करण्याच्या प्रयत्नाबद्दल कुणीही राजकर्ता तुमच्या प्राणांची आहुति घेतल्यावांचून राहणार नाहीं.

**जय०** पण मला प्राणाची मुळींच पर्वा नाहीं. जगदेवराव जर बंधमुक्त होऊन आपल्या बायकापोरांत जात असतील तर या माझ्या यःकश्चित् प्राणांची मला मुळींच पर्वा नाहीं.

**शिवा०** उत्साहाच्या भरांत तरुण पुरुष केवढालीं साहसाचीं कामं करतात, हें जर पहायचं असेल, तर जयवंतरावांकडे पहावं ! ज्या साहसाच्या जोरावर त्यांनीं जगदेवरावांना कैद केलं, त्याच साहसावर भिस्त ठेवून ते आज जगदेवरावांना कैदेंतून मुक्त करीत होते. साहस हा गुण आहे. पण गुणाची किंमत त्याच्या योग्य उपयोगावर असते; आणि म्हणूनच एका प्रसंगीं जो सद्गुण म्हणून समजला जातो, तोच दुसऱ्या वेळीं दुर्गुण म्हणून गणला जातो. जगदेवराव ! जयवंतरावांच्या या अलैकिक साहसाला मान देण्याकरतां मीं तुम्हांला बंधमुक्त केलं असतं, परंतु—

**जग०** पण बंधमुक्त व्हायला मी तयार असेन तर ना ? शिवाजी ! या जगदेवानं आजपर्यंत कुणाचेही उपकार घेतले नाहींत. उपकार घ्यायच्या संवयीनं मनुष्य दुसऱ्याचा मिंधा होतो आणि आपली स्वतंत्रता गमावून लाचार स्थितींत आयुष्य कंठीत असतो.

**शिवा०** खरं आहे. तुमचं म्हणणं मला अक्षरशः कबूल आहे. पातशहाचे आपल्यावर उपकार झाल्यामुळं आपण वैभवाला पोहोंचलों, अशी कल्पना करून घेऊन तुम्हीं पातशहाचे गुलाम झालां. ही गोष्ट तुमच्या मनाला खाऊं लागली आणि म्हणूनच आतां तुम्हीं दुसऱ्याचे उपकार घ्यायला भितां आहां. जयवंतराव ! तुम्हीं प्राण द्यायला तयार झालांत तरी ज्याअर्थी जगदेवराव हा कैदखाना सोडायला तयार नाहींत त्याअर्थी आपले प्राण धोक्यांत घालून त्यांना सोडविण्याचा खटाटोप तुम्ही व्यर्थ केलात, हें तुमच्या लक्षांत आलंच असेल.

**जय०** आणि म्हणूनच त्यांना सोडविण्याची माझी इच्छा जास्त जास्त वाढत आहे. जगदेवरावाबद्दल माझ्या मनांत असलेला आदर त्यांचा हा थोरपणा पाहून द्विगुणित झाला. माझ्या हातून महाराजांनीं आजपर्यंत बरीवाईट कामगिरी घेतली ! कित्येक लढायांत महाराजांच्या पुण्यप्रभावानं मला जय मिळाला ! कित्येक नवीन मुलूख महाराजांच्या कृपेनं मी मिळवून द्यायला

कारण झालों! जगदेवरावांसारखे चार दोन वीरही मीं बंदिवान् करून महाराजांच्या पायांशीं आणले! या माझ्या कामगिरीबद्दल मीं आजपर्यंत महाराजांजवळ बक्षिस म्हणून मागितलं नाहीं. पण तें बक्षिस जर मला महाराज देत असले, तर महाराजांनीं माझे प्राण घेऊन जगदेवरावांना बंधमुक्त करावं. हेंच बक्षिस मी मागत आहें! महाराज! ही माझी विनंति आपण अमान्य करूं नका.

**शिवा०** पण तुमचे प्राण जाऊनसुद्धां जगदेवराव बंधमुक्त व्हायला तयार पाहिजेत ना!

**जय०** ती गोष्ट अलाहिदा आहे. आपण जगदेवरावांना सोडलं आहे असं म्हणा म्हणजे झालं!

**शिवा०** असं मी कधींही म्हणणार नाहीं. जगदेवरावांसारख्या पुरुषाला मोकळा सोडायला मी मुळींच तयार नाहीं.

**जय०** पण मी त्यांच्याकरतां जन्मभर आपला बंदिवान् राहतों आणि आपली इच्छा असेल तर या घटकेलाच स्वतःच्या हातानं स्वतःची गर्दन उडवून घेतों!

**शिवा०** जगदेवरावाला सोडविण्याचा प्रयत्न केल्याबद्दल तुमची गर्दन जाणारच आहे.

**यमा०** ( आपल्याशीं ) माझंही म्हणणं हेंच आहे.

**जय०** तर मग माझी गर्दन जाण्यापूर्वीं जगदेवराव थोडावेळ तरी आपल्या स्वतःच्या घरीं बायकामुलांस जाऊन आलेले मी पाहिले तर मी मोठ्या समाधानानं मरेन. महाराज! तेवढं समाधान—तेवढा आनंद—तेवढं सुख मला मरणापूर्वीं द्याच. नाहीं म्हणूं नका. ही माझी अखेरचीच विनंति आहे. महाराज—

**शिवा०** तुमची तशी इच्छाच असेल तर मी त्यांची फक्त एक दिवसाकरितां सुटका करतों. तेवढ्या मुदतींत त्यांनीं आपल्या कुटुंबांतल्या माणसांची भेट घ्यावी आणि पुन्हां या कैदखान्याची हवा खायला परत यावें. जगदेवराव! माझं म्हणणं तुम्हीं ऐकलंच आहे. ही पहा! सूर्योदयाची वेळ झाली. या घटकेला तुम्ही घोड्यावर स्वार व्हा आणि बायकामुलांना भेटून उद्यां उजाडण्यापूर्वीं इथं परत या.

**जग०** मीं ही गोष्ट कधींही कबूल केली नसती; पण कांहीं झालं तरी मला बंधमुक्त करण्याचा जयवंतरावांचा निश्चय पाहून माझ्या मनांत त्यांच्याबद्दल अत्यंत प्रेम उत्पन्न झालं आहे. जयवंतराव ! तूं कुणाचा कोण ! तूं माझा मित्र नव्हेस, भाऊबंद नव्हेस किंवा सोयराधायराही नव्हेस. तर उलट तूं माझा शत्रू असून, ज्याअर्थीं तूंच मला सोडवूं पहातो आहेस, त्याअर्थीं तुझ्या प्रेमाला–तुझ्या साहसाला–तुझ्या अलौकिक उदारपणाला मान देण्याकरतां, मी एक दिवसाच्या आंत चंद्रावती आणि विश्वास यांना भेटून येईन. पण शिवाजी ! ही गोष्ट मी फक्त एकाच अटीवर मान्य करीन. जयवंतरावांच्या अपराधाबद्दल त्याची गर्दन उडविण्याची शिक्षा रद्द झाली, असं तूं मला आतां सांगितलं पाहिजेस.

**शिवा०** जगदेवराव ! जयवंतरावांनीं अविचारानं तुम्हांला कैदेतून सोडविण्याचा प्रयत्न केला, याबद्दल आमच्या कायद्यानं त्यांना देहांतशासनाची शिक्षा ठरवली आहे आणि ती शिक्षा रद्द करणं इष्ट नाहीं.

**जग०** मग मलाही तुझं म्हणणं कबूल नाहीं. जयवंतरावाचे प्राण वांचून जर मला माझ्या प्रिय माणसांच्या भेटीचं सुख मिळणार असेल तरच तें मला पाहिजे आहे. एवढयाशा माझ्या सुखाकरतां जो स्वतःचे प्राण द्यायला उद्युक्त झाला, त्याचे प्राण वांचविण्याला जर मी यत्किंचितही कारण झालों नाहीं, तर त्या सुखाच्या उपभोगापेक्षां दुःखाच्या उपभोगाचाच अनुभव मला जास्त मिळेल.

**जय०** जगदेवराव ! आपण महाराजांचं म्हणणं मान्य करा. मीं जें कृत्य केलं तें कायद्याच्या दृष्टीनं पाप असलं तरी माझ्या दृष्टीनं तें पुण्यच आहे. पण आपण आतांच्याआतां येथून निघून जा आणि आपल्या मुलांबाळांची भेट घ्या. जगदेवराव ! एवढया पुण्याचा लाभ मला मरतां मरतां तरी घेऊं द्या.

**जग०** पण तुझ्या उपकारांतून सुटायला मला कांहींच साधन न राहिल्यामुळं मला नित्याचा अधःपात भोगावा लागेल, याची वाट काय ?

**शिवा०** हा प्रसंग मोठा कठीण आला. आतां मींच याला कांहीं तरी तोड काढली पाहिजे. जगदेवराव ! जयवंतरावांच्या उपकाराबद्दल तुम्हांला

उतराई होण्याचा खरा मार्ग म्हणजे तुमच्या शब्दाला मान देऊन त्यांना क्षमा करणं हाच आहे. मी जयवंतरावांना त्यांच्या अपराधा क्षमा करून त्यांची शिक्षा रद्द करतों.

**जग०** मग मला तुझं म्हणणं कबूल आहे.

**जय०** माझ्या मेहनतीचं अंशतः तरी सार्थक झालं !

**शिवा०** तुम्हीं ठरलेल्या मुदतींत परत याल याबद्दल मला स्वत मुळींच शंका नाहीं. पण कायद्याप्रमाणं तुमच्याबद्दल कोणीतरी ओलीस र जरूर आहे. ह्या जयवंतरावांना तुमच्याबद्दल आम्हीं ओलीस ठेवतों. जय राव ! तुम्ही तयार आहां ना ?

**जय०** हो, तयार आहें ! ठरलेल्या मुदतींत जर जगदेवराव पर आले तर वाटेल ती शिक्षा भोगायला मी तयार आहें.

**शिवा०** तर मग जगदेवराव ! तुम्हीं आपल्या घरीं जाऊन सूर्योदयाच्या आंत पुन्हां परत या. तोंपर्यंत हे जयवंतराव तुमच्याक ओलीस म्हणून या कारागृहाचा अनुभव घेतील ! उद्यां या वेळपर्यंत तुम्हीं परत आलां नाहीं तर आतांप्रमाणंच या उगवत्या सूर्याचीं प किरणं या पृथ्वीवर पडल्याबरोबर टकमकीच्या टोंकावरून या जयवंतराव कडेलोट केला जाईल !

**जय०** } कबूल.
**जग०** }

पडतो

# अंक तिसरा.



## प्रवेश पहिला.



स्थळ—यमाजींचें घर.

[ तोहमत व हिकमत येतात. ]

**तोह०** कां हिकमतराव ! कालची हिकमत कशी काय फळाला आली ? अंगबिंग कितपत ठेचलं ?

**हिक०** हो, झालंय खरं तुम्हांला हिणवायला.

**तोह०** त्यः त्यः त्यः त्यः ! अहो, करावं तसं भरावं. काल आमच्या डोळ्यांत अंजन भरलंत नाहीं का ? त्या अंजनानं आमच्या बुद्धीला पुढचा प्रकार दिसला आणि म्हणूनच आम्हांला घरीं यायची बुद्धि झाली.

**हिक०** मग त्यांत माझे उपकार माना. अहो, मी जर तशी तुमची चेष्टा केली नसती तर तुम्ही कशाला घरीं परत आलां असतां ? आज गंगले नदीच्या कांठावर शेण्यागोंवऱ्यांत समाधि घेऊन धुराच्या रूपानं स्वर्गांत गेलां असतात.

**तोह०** अहो मी ? मी असतों तर हा प्रसंगच आला नसता !

**हिक०** नसता आणि असता ! आला एवढं खरं ! आमची अक्कलच तुम्हांला भोंवली !

**तोह०** आपली अक्कल पाघळायची जरा बंद करा. अकलेचे झरे वाहू लागले असले तर पोकळ डोक्यांत जरा सांठा चांगला होऊं द्या ! नाहीं तर एकं पुन्हां आपलं कोरडं ठणठणीत होईल.

**हिक०** त्याची कांहीं धास्ती नको. सांठा भक्कम आहे. एखाद वेळ आपलाच वाडा आपल्याच अंगावर कोसळावा तसं होतंच आहे !

**तोह०** पण काय हो हिकमतराव! त्या जयवंतरावानं तुम्हांला म तरी कसं बुवा! आश्चर्य आहे.

**हिक०** अहो, कसं मारलं आणि काय मारलं? आतां काय सांगाय 'जावें त्याच्या वंशा, तेव्हां कळे.'

**तोह०** किल्लेदारसाहेब म्हणत होते, कीं तुम्हीं अगदीं मित्र आणि पि पिळींत आहां! कसा मार खाल्ला!

**हिक०** कसा खाल्ला? तुझांला दाखवूं का! हे बघा ह्यांनीं मला प्र असं धरलंन्! (तोहमतरावाला धरतो) आणि अशी मानगुटी ध असं धाडकन् पाडलन्! (पाडतो) आणि मग काय? उरावर बसून अ चार ठोसे बरगडींत मारलेन् (मारतों, मरतों असें तोहमत ओरडतो व रड कां कळलं का?

**तोह०** (उठून) हें कायहो हिकमतराव? अजून तुमची मस्ती जि नाहीं. या तुमच्या मस्तीमुळेंच वरिष्ठांचा तुमच्यावरचा विश्वास उडाला आ आपलं गरिबीनं चाललं तर नाहीं चालत? अहो, वरिष्ठांशीं नम्रपणानं वाग तरच पोटांतल्या नाजुक कामगिऱ्या आम्हांला मिळतात.

**हिक०** सरकारी का खासगी?

**तोह०** अहो सरकारी खासगी हा भेद आह्मां एकनिष्ठ सेवकांजव नाहीं. वरिष्ठ काय सांगतील तें करायचं! 'मार याच्या दोन थोबाडींत मारायच्या! 'लाव याच्या घराला आग' लावायची! 'घाल त्या हराम खोरावर मारेकरी' घालायचे! 'घेऊन ये त्या आमच्या नायकिणीला आणायची! अशीं कामं करावीं लागतात; आहांत कुठं राव?

**हिक०** हें बघा, आह्मांला कुणीं शिकवलंच नाहीं. शिकवल्यावांचू का येणार?

**तोह०** अहो, शिकवायला कशाला पाहिजे? आम्ही थोडंच शिकलों हें! अहो, उपजत बुद्धि लागते याला. नाहीं तर वडलार्जित तरी यावं लागतं माझे वडील बघा एका खानाकडे मुलं खेळवायला होते. पण खानसाहेबांनं सांगितलं तर वरांतलं वाटलं तें काम करीत! कोणचं काम ते करीत नसत किंवा त्यांना येत नव्हतं असं कांहीं नाहीं. अहो, रक्तांत यावं लागत फुकटच नाहीं.

हिक० खरं आहे.

तोह० अहो छे: हो. किल्लेदारसाहेबांचं माझ्यावर मी लहान होतों तेव्हांपासून फार प्रेम. म्हणून ते आपले तसं म्हणतात.

हिक० काय पाखरूं म्हणून ! होय ना ?

तोह० तुम्हांला म्हणतात का ?

हिक० छे: ! आह्मांला कुठं म्हणणार ? आमच्या कुठं आहे तेवढं नशिबीं ? बरं, काय पाखरूंसाहेब ?

तोह० अहो, हें आपलं आपल्यांतच ठेवा. नाहीं तर तुम्ही काय, गुप्त गोष्टीसुद्धां वाटेल तशा भरळत सुटतां. चारचौघांत उद्यां गोष्ट काढाल आणि माझं पाखरूं म्हणून नांवच पडून जाईल.

हिक० ती नको तुह्माला काळजी. फार तर लोक म्हणतील हे आले हिमतराव पाखरे म्हणून.

तोह० तसं म्हणतात का ! पण किल्लेदारसाहेब मला खरोखरच पाखरूं म्हणत होते कांहो ? खरंच—

हिक० अगदीं खरं. ते आले कीं त्यांनाच विचारा पाहिजे तर ! चला, आपण जरा आंत जाऊं आणि किल्लेदारसाहेबांची वाट पाहूं.

[ दोघेहि जातात व यमाजी भास्कर येतो ].

यमा० आतां मात्र डोकं फिरून जायची वेळ आली. जयवंतरावाची ब्याद दुनियेंतून हद्दपार होण्याची केवढी संधि ! पण महाराजांनीं घात केला. महाराज जर ऐनवेळेला येऊन घोंटाळा करते ना,—तर जयवंतराव ! मालतीच्या ऐवजीं माझ्या तरवारीनं तुझ्या गळ्याला मिठी घातली असती आणि मालतीनं आपल्या कोमल हातांनीं तुझ्या अंगावर उधळलेल्या कुसुंबी रंगाऐवजीं तुझ्या रक्ताचा रंग या माझ्या समशेरीनं माझ्या अंगावर उडवला असता. बरं, महाराजांनीं तरी त्याच्या अपराधाबद्दल काय शिक्षा करायची ! तर तेंही नाहीं. उलट त्याला माफी मिळून आम्हांला थोबाडींत मारून घ्यावी लागली. परवां जगदेवाच्या वेळेला तेंच ! जगदेवाचं डोकं जों मी उडवणार, तों महाराज आपले दत्त म्हणून हजर ! ते भिंतींतून निघतात, का तक्तपोशींतून पडतात, का

फरसबंदींतून उगवतात कांहीं कळत नाहीं. त्या कोठडीला चोरदार अ म्हणून बोटनूबोट जागा तपासून पाहिली, पण कांहीं थांग लागत नाहीं.-भ्रं व्हायची पाळी आली! हा जयवंतराव मेला पाहिजे—भाजला पाहिजे, त्य अगदीं चेंदामेंदा झाला पाहिजे. जगदेव जर सूर्योदयापूर्वीं आला नाहीं तर ज वंतरावाचा कडेलोट करावयाचा नाहीं का? कसं बरं? काय नामी यु सुचली! जें काम अंधारकोठडींत झालं नाहीं, तें उघडया मैदानांत होतंय पाहूं. अहो हिकमतराव! अहो हिकमतराव! [ हिकमत येतो.

**हिक०** काय हुकूम आहे?

**यमा०** तुमची तब्येत कशी काय आहे?

**हिक०** पुन्हां मार खाण्याइतकी अद्याप बरी नाहीं झाली!

**यमा०** मग तुम्हांला एखाद्या कामावर नाहीं जातां येणार इतक्यांत?

**हिक०** नाहीं, तसा मी बरा आहें. तसंच काम असलं तर कां न जाणार?

**यमा०** मग ठीक. काय सांगूं हिकमतराव! तुम्हाला जयवंतराव मारलं हें पाहून माझं डोकं इतकं फिरलं, कीं मी त्या मगरमस्ताचं डोकं उडवून देत होतों.

**हिक०** पण दिलं नाहींत हेंच बरं झालं. नाहीं तर महाराज रागावे असते.

**यमा०** पण त्या वेळीं महाराजांचासुद्धां मला असा राग आला कीं कां विचारूं नका. मी जर महाराजांच्या जागीं असतों तर जयवंतरावाचे पां पांट काढून गाढवावर उलटा बसवून सगळ्या किल्लाभर त्याची धिंड काढ असती आणि नंतर त्याला उभा चिरून त्याच्या अंगांत मीठ भरून त्या हाल हाल करून त्याला ठार केला असता.

**हिक०** जाऊंद्या. महाराजांनींही त्याला क्षमा केली आणि माझाही का खून झाला नव्हता!

**यमा०** पण महाराजांनीं क्षमा केली म्हणून आपण काय म्हणून कर याची? आणि आपल्या हातांत तो चांगला सांपडला असतांना त्याला सुख काय म्हणून सोडायचा?

हिक० ( स्वगत ) अं: !–स्वारीच्या मनांत कांहीं तरी दुष्ट विचार आला आहे. होला हो देऊन काढून घेतलं पाहिजे पोटांतलं सारं !

[ कळ आल्याचं ढोंग करतो. ]

यमा० कां, बोलत का नाहीं ? तोंड वाकडसं करतां ?

हिक० इतक्यांत या बरगडींतून अशी कळ आली, अगदींच बोलवेना ! आयाई !

यमा० पाहिलंत ! अहो, तुम्हांला कुठं तरी जबरदस्त जखम झाली असली पाहिजे. हिकमतराव ! याबद्दल त्याला प्रायश्चित्त दिलंच पाहिजे.

हिक० पण तें देणार कसं ?

यमा० अगदीं कायदेशीर रीतीनं !

हिक० तें कसं काय ?

यमा० जगदेव घरीं गेला आहे. तो उद्यां सूर्योदयापर्यंत परत आला ाहीं तर जयवंतरावाचा कडेलोट व्हायचा आहे ना ?

हिक० बरं मग ? जगदेवराव सूर्योदयाच्या आंत आल्यावांचून कसा ाहील ?

यमा० पण आपण त्याला सूर्योदयाच्या आंत येऊं दिला नाहीं तर ? पहा, तुम्ही इतकं करा; जगदेवाला वाटेंत तोंपर्यंत अडवून ठेवा. मी कडे जयवंतरावाचा एळकोट मल्हार करतों.

हिक० ( कळ आलीसं दाखवून ) अयाई ! अरे बापरे ! काय ळ आली ! अगदीं जीव कासावीस झाला. खंडोबाची तळई तरी रा हो !

यमा० नका, घाबरूं नका. असेच पडून रहा जरा.

हिक० काय करूं हो. त्या हरामखोराला हिरवा खाल्ला असता !

यमा० खरं आहे.

हिक० भाजून टाकला असता !

यमा० अगदीं खरं बोललांत.

हिक० गरगर फिरवून फेंकून दिला असता !

यमा० बरोबर बोललांत.

हिक० नरडं फोडून घटाघट रक्त प्यायलों असतों !

यमा० असा जोर धरला पाहिजे. पण तुम्हीं आतां जरा पडून रहा.

हिक० अरे बापरे पुन्हां कळ ! किल्लेदारसाहेब ! या कळीमुळं हो, न तर हें काम मी सहज केलं असतं.

यमा० कांहीं काळजी करूं नका, मी तोहमतरावांना सांगतों. कांहीं कमी नाहींत !

हिक० तसंच करा.–मला घेरी येते. [ बेशुद्ध पडल्याचें सों करतो. ]

यमा० आतां याची सुश्रूषा करीत बसलों, तर हातचं सावज जा शिकार फसण्याची वेळ आहे. मरूंद्या याला इथं. अगोदर तोहमतला घ्या. तोहमतराव ! अहो तोहमतराव ! [ आंत जातो.

हिक० खरा यमाजी भास्कर आहे! या हरामखोराला कांहीं अंतःक तरी आहे का ? जयवंतरावांनीं मला मारलं तर त्यांच्यावर माझा राग असा पण महाराजांनीं त्यांना माफी दिल्यावर आह्मीं काय म्हणून त्यांचा करावा ? बरं त्यानं मारलं, ते हिकमतराव म्हणून का मारलं ? त्यानं पा कऱ्याला मारलं आणि पहारेकऱ्याच्या खटल्याचा निकाल लागला. या यमा भास्कराच्या मनांत जयवंतरावाबद्दल मालतीमुळं खासगी द्वेष आहे अ म्हणून तो त्याच्यावर इतका जळतो आहे. अरे पण–( पुन्हां पडतो. )

[ यमाजी भास्कर व तोहमतराव येतो. ]

यमा० तोहमतराव ! हें काम जर झालं नाहीं तर--

तोह० किल्लेदारसाहेब ! आपण मुळींच फिकिर करूं नका. का माझं आहे.

यमा० आणि तुम्हीही माझे मनुष्य आहां.

तोह० आहेच म्हणजे ? सकाळची कामगिरी केली कीं नाहीं ? आ मालतीबाईसाहेब गांवाला गेल्या, त्याला माझा नाईलाज आहे. आ झडतीचा जर हुकूम द्याल तर जगदेवाच्या घरीं जाऊन पुढें घालून मालती घेऊन येतों. अगदीं काळजी करूं नका.

**यमा०** तूर्त तें राहूं द्या. अगोदर जगदेवाची वाटेवर टेहेळणी करा आणि कसा तरी त्याचा रस्ता चुकवून त्याला नेमका त्या भैरवखिंडींत आणा. मग तो आहे आणि आम्हीं आहोंत.

**तोह०** तें काम माझें. मी त्याला चकवून असा आडरस्त्याला आणतों, कीं—

**यमा०** काम फत्ते ! वाः ! चला तर मग आतां जलदी करा.

**तोह०** ते हिकमतराव पडले आहेत वाटतं तिथं.

**यमा०** मरूं द्या हो त्याला. तुम्ही कामाला लागा लौकर. मीही लागतों तयारीला ! [ यमाजी व तोहमत जातात. ]

**हिक०** अरे हरामखोरा ! जगदेवांच्या मार्गांत विघ्न आणून त्यांना सूर्योदयापर्यंत वाटेंतच अडकवून ठेवायचा तुझा बेत आहे नाहीं ? पण तुझा हा बेत जर ढांसळून न टाकीन तर नांवाचा हिकमतच नव्हे. हेराचा धंदा करायचा कशाला ? आम्हीं महाराजांचे हेर ! महाराजांचा हुकूम पार पाडून प्रजेचं कल्याण करायचं ? का या यमाजी भास्कराच्या सैतानी खेळाला सहाय्य करून गरीब लोकांचे गळे कापायचे ? एखादा रस्ता चुकत असला तर त्याला नीट रस्त्यावर आणायचं ? कां जाणून बुजून आडरस्त्याला न्यायचं ? हरामखोरांनो ! तुमचा रस्ता चुकला आहे हें तुमच्या डोळ्यांत अंजन घालून दाखवतों पहा ! [ जातो. ]

---

## प्रवेश दुसरा.

—:०:—

### स्थळः—जगदेवरावांचा वाडा.

[ चंद्रावती व मालती. ]

**चंद्रा०** मालती ! तूं कांहीं तरी मनाची समजूत करते आहेस झालं शत्रूच्या हातांत सांपडल्यावर ते परत येण्याची आशा !—छेः ! नांवसुद्धां काढूं नकोस.

पद १९ वें. राग धानी, ताल त्रिवट.

खचित प्रबल रिपु सतत हवन कारि ॥ हतबल नर
किति जळति समिध पारि॥ धृ०॥ कुंड प्रखर आति तो
शिव तें कारि। आहुति अर्पिल मम पतिची खरी ॥ १ ॥

**माल०** पण मी तुला इतकं खास सांगतें, कीं ते आज आतां या वेळेला इथं आल्यावांचून कांहीं राहत नाहींत. शत्रुशत्रूंत फरक असतो. जगदेवरावांचे शत्रु शिवाजीराजे आहेत हें ध्यानांत ठेव.

**चंद्रा०** अग शिवाजीसारखा शत्रु आहे म्हणूनच तर मी अगदीं निराश झालें आहें. अफजुलखानाची त्यानं काय वाट केली? वरवर भीतीचा इतका बहाणा केला, कीं कांहीं विचारूं नकोस. पण शेवटीं त्या भीतीचं पांघरूण काढून टाकून त्यानं कपटानं खानाच्या पोटांत वाघनखं खुपसून पाठवला कीं नाहीं त्याला अल्लाच्या डेऱ्यांत? तशीच गोष्ट चंद्रराव मोऱ्यांची! सोयरिकीच्या गोष्टी काढून त्याला गुंतवून ठेवलं आणि संभाजी कावजीकडून त्याचा खून करवला. अग, अशीं एक का दोन कितीक उदाहरणं दाखवून देतां येतील त्या शिवाजीच्या दगलबाजीचीं.

**माल०** पण अफजुलखान मुळीं आपल्याला कपटानं ठार करायला आला आहे, हें जर शिवाजी महाराजांना अगोदरच कळलं होतं आणि भेटीच्या वेळींही खानानंच जर अगोदर तरवार उपसली, तर महाराजांनीं तरी काय म्हणून त्याची गय करावी? त्यांच्या अंगांत हिम्मत असून त्यांनीं मुकाट्यानं मरून जावं? चंद्रराव मोऱ्यांच्या बाबतींत तरी महाराजांचा काय दोष? संभाजी कावजीच्या देखत महाराजांवर त्यांनीं शिव्यांची लाखोली वाहिली, तेव्हां संभाजी कावजीला राग येऊन त्यानं आपल्या समशेरीच्या झटक्यानं चंद्ररावाला प्रायश्चित्त दिलं! यांत महाराजांकडे कसला दोष? ताई! महाराजांच्या मनांतून जर जगदेवरावांचं बरंवाईट करायचं असतं, तर त्यांनीं त्यांना मुद्दाम जिवंत पकडून आणण्याचा हुकूम कां दिला असता?

**चंद्रा०** मग तुला खास वाटतं, शिवाजीकडून त्यांच्या जिवाला कांहीं अपाय घडायचा नाहीं म्हणून?

**माल०** अपाय घडायचा नाहीं इतकंच नव्हे, तर आज जगदेवराव इथं आल्यावांचून राहणारही नाहींत.

**चंद्रा०** पण इतकी खात्री तूं कशावरून देतेस तेंच मला समजत नाहीं !

**माल०** कां देतेस, कशावरून देतेस, हे प्रश्न मला करूं नकोस. माझं आपलं म्हणणं ऐक. पहा तें खरं होतं कीं नाहीं तें ! ( सुभान्या येतो. )

**चंद्रा०** पण कायग ? हा सुभान्या म्हणत होता, कीं त्यानं तुला पत्र दिलं तेव्हां एक तरुण सरदार तुझ्याशीं बोलत होते ते कोणग ?

**माल०** कोण बरं ? मला नाहीं आठवत. ( एकीकडे सुभान्यास ) मेल्या, सांगितलंस वाटतं ताईला ?

**चंद्रा०** आठवत नाहीं म्हणजे ! कालची गोष्ट तुला आठवत नाहीं ?

**माल०** विसरतच नाहीं वाटतं एखादी गोष्ट मनांतनं ?

**चंद्रा०** म्हणजे ? अशी कशी विसरेल ? सुभान्या ! हिला आठवण कररे—

**सुभा०** बाईसाहेब—

**माल०** सुभान्या—

**सुभा०** पुढं नाहीं आठवत बाईसाब !

**चंद्रा०** तुलाही आठवेनासं झालं का इतक्यांत ?

**सुभा०** मला बगा आतां पावतु आठवत व्हतं—

**चंद्रा०** मग आतांच आठवेनासं झालं ? तुला काय बळी द्यायला काढलाय वाटतं ?

**सुभा०** भवानीच्या म्होर उभा केल्यावर—

**माल०** सुभान्या !—

**सुभा०** अर बाबर ! माझ डोल गेल्य बगा ! ( डोळे झाकून ) दिसतबी न्हाई !

**चंद्रा०** पण डोळ्याचा आणि आठवणीचा काय संबंध ?

**सुभा०** आतां आठवायला लागलं बगा ! एक तरना जवान—गोरा गोरा पान सरदार व्हता थत.

**माल०** सुभान्या !—

सुभा० माझं कानबी फुटलं बगा. आतां मासनी एकबी येइनासं झालं तंवा त्यो सरदार अन् आमच्या मालतीबाई अशा बगा अगदीं चिकटून उभ्या—

माल० मेल्या, तुझी वाचा बंद पडत नाहीं वाटतं ?

सुभा० छत्. बोल फुटल, कानही ग्येल !

माल० म्हणून हा जिभेचा पट्टा चालवला आहेस वाटतं ?

चंद्रा० मग पुढं ?

सुभा० म्होर व्हय ? म्होर बगा मला दिसल न्हाई. पण जी दोघांची भांडाभांड झाली, त्ये बगा दोघांनीं एकमेकांना धरल. अन् काडल चाव एकमेकांचं अन् काय ?

माल० सुभान्या !–मेल्या तुला दाखवतें हं !

( सुभान्याला मारायला धावते–तो पळतो. )

चंद्रा० मालती ! कोणग तो सरदार !

माल० ताई ! तूं सुद्धां माझी चेष्टा करतेसना ? मी नाहीं सांगत जा.

चंद्रा० अग, मी चेष्टा करीत नाहीं. सुभान्या म्हणत होता, कीं तुला पत्र दिल्यावर तूं त्या सरदाराला कांहीं सांगितलंस आणि लागलीच त्यानं असा कांहीं घोडा उडवला—

माल० ( एकदम चपापून ) ताई ! तो पहा, चौफेर घोडा उडाला ! वर कोण आहेग ?

चंद्रा० माझा बाळ विश्वास ! अरे देवा ! हें काय नवीन संकट आलं पहा ! सुभान्या ! अरे सुभान्या ! धांव धांव-विश्वासाचा घोडा उधळला ! विश्वासला वांचव–धांव धांव !

माल० ताई ! भिऊं नकोस. तो पहा विश्वास आणि दुसरे कुणी तरी गृहस्थ घोडे उडवीत इकडेच येत आहेत.

चंद्रा० मालती ! तुझ्या तोंडांत साखर पडो, स्वारीच आली !

माल० कां माझं म्हणणं खरं झालं कीं नाहीं ? पण हे पहा—

( जगदेव व विश्वास येतात. चंद्रावती, जगदेव व विश्वास एकमेकांस भेटतात. )

जग० चंद्रावती !

**चंद्रा०** महाराज ! देवाच्या कृपेनं आपलं पुन्हां दर्शन झालं.

पद २० वें. राग तिलककामोद, ताल दीपचंदी.

**फुलला निशिगंध गमे चंद्र परत गृहा आला गगनीं ॥धृ०॥**
**तारा नभीं त्या खुलती स्वतेजें, वेली सुगंधे फुलती ।**
**बघुनि पति निजनेत्रांनीं ॥ १ ॥**

**जग०** पण हें दर्शन क्षणिक आहे. चंद्रावती ! एक घटकेनं मला पुन्हां परत जाण्याकरितां निघालं पाहिजे !

**चंद्रा०** म्हणजे ? आपली कायमची मुक्तता नाहीं झाली तर मग ? आपल्याला परत गेलंच पाहिजे का ?

**जग०** गेलंच पाहिजे. एका शूर तरुणाच्या धाडसामुळं आणि शिवाजी-राजाच्या उदारपणामुळं मला तुमच्या भेटीला येतां आलं.

**चंद्रा०** तें कसं ?

**जग०** ती सगळी हकीगत सांगूं लागलों, तर ही एक घटका केव्हांच निघून जाईल. पण चंद्रावती ! उद्यां सूर्योदयाच्या आंत जर मी गडावर पुन्हां दाखल झालों नाहीं, तर माझ्याकरतां ओलीस राहिलेल्या तरुण सरदाराचा कडेलोट होईल.

**माल०** अगबाई !

**जग०** कोण मालती ! या वेळीं तूंही मला भेटलीस, फारच बरं झालं. चंद्रावती ! ज्या तरुण पुरुषानं मला युद्धामध्यें निःशस्त्र करून बंदिवान् केलं तोच तरुण सरदार तुमची माझी भेट व्हावी म्हणून माझ्याकरतां प्राण द्यायला तयार झाला. पण परमेश्वरानं त्याचे प्राण वांचवले. पण तोच सरदार माझ्याकरतां ओलीस राहून त्यानं आपले प्राण पुन्हां धोक्यांत घातले.

**चंद्रा०** अहाहा ! कोण हा उदारपणा !

**जग०** त्याचा पराक्रम आणि उदारपणा पाहून मी थक्क झालों ! खरो-खरच मालती जर माझी मुलगी असती, तर त्या सरदाराला त्याच्या सद्गुणांचं पारितोषिक म्हणून मी बहाल केली असती !

चंद्रा० खरंच का ? त्या सरदाराचं नांव तरी काय ?

जग० त्याचं नांव जयवंतराव भोसले.

चंद्रा० मालती ! होय ना !–जयवंतरावच ना ते ?

माल० ताई ! गप्प बस हं आतां ! नाहीं तर बघ.

जय० मालती ! त्यालाच तूं योग्य आहेस. तूं खरोखरच त्या तरु पुरुषालाच माळ घाल. मी परत गेल्यावर त्याला तुझ्याबद्दल असंच सांगि तल्यावांचून रहाणार नाहीं.

माल० ( एकीकडे ) आपण सांगायची कांहीं जरूर नाहीं. माझं मी घेईन पाहून.

विश्वा० मावशी ! मावशी ! बाबा ! मावशीचं लगीन करून टाकान लौकर.

जग० बाळ विश्वास ! [ सुस्कारा सोडतो.

चंद्रा० माझ्या बाळाच्या जिवावरचं आज संकट टळलं म्हणायचं !

विश्वा० तें कायग आई ?

चंद्रा० त्या बेफाम घोड्यानं तुला आज तुडवला असताना ? मीं हजार वेळां सांगितलं, त्या घोड्यावर बसत जाऊं नकोस म्हणून ! पण तूं ऐकतच नाहींस.

विश्वा० मग तो कायं मला खातो कीं काय ? आई, मघाशीं बघ मोठी मौज झाली ! मी रिकिबींत पाय ठेवून घोड्यावर बसतोंय, तों बाबा घोडा उधळीत येतांना मला दिसले. मला मग बघ रहावेना ! मीं जी घोड्याला टांच मारली, तों घोडा चौफेर उडाला.

चंद्रा० मला वाटलं त्यांचा घोडा बेफाम झाला. याला कांहीं तो आव रत नाही.

जग० मलाही तसंच वाटलं.

विश्वा० आणि म्हणूनच तुम्हीं घोडा आडवा घातलात वाटतं ? अरेच्चा ! तो घोडा बघा माझ्याशीं मुळींच गडबड करीत नाहीं. मीं बाबांना घेऊन यावं म्हणून मुद्दाम सोडला होता त्याला तसा.

**जग०** शाबास ! चंद्रावती ! माझी वेळ भरत आली. मला आतां निघालं पाहिजे.

**चंद्रा०** पण आपण अगदीं थकलेले दिसतां. सगळ्या दिवसाचे उपाशी दिसतां, जरा आंत चलावं, कांहीं थोडं फराळाचं खावं, मग निघायचं आहेच !

**जय०** बरं चल. बाळ विश्वास !—

[ जगदेव, विश्वास, चंद्रावती जातात. ]

**माल०** ( स्वगत ) जयवंतराव ! एका घटकेकरतां कां होईना, जगदेवरावांची मुक्तता करून तुम्हीं आपलं वचन खरं केलंत. आतां ही मालती, सर्वस्वी तुमची आहे. आपल्या कर्तृत्वाबद्दल या मालतीला जर खात्री नसती तर तिनं आपल्याला ही जोखमीची कामगिरी सांगितलीच नसती, पण या कामांत-जयवंतराव ! जर आपल्या जिवावर भलताच प्रसंग आला असता तर ही मालतीही आपल्या पाठोपाठ आपल्या भेटीला आली असती. पण आतां—

पद २१ वें. राग पिलु, ताल धुमाळी.

**तव मंगल वदन उदेलें । तेज बहु आलें ॥**
**मुख खचित प्रेममय झालें ॥ धृ० ॥**
**रविचंद्रा नभिं दिपवुनि गेले सफल मनाचे**
**कोड जहाले ॥ तेज बहु० ॥ १ ॥**

कोण बाळ विश्वास ? ( विश्वास येतो. ) कांरे अगोदरचसा आलास ?

**विश्वा०** मावशी ! बाबा किनई त्या जयवंतरावाच्या एक एक गोष्टी सांगत आहेत. आई म्हणाली मावशीला ऐकायला घेऊन ये, म्हणून आलो. चल, चल लौकर.

**माल०** मी नाहीं येत जा. मला समजतील मग त्या

**विश्वा०** मग ग कोण तुला सांगणार ? जयवंतराव येणार आहेत वाटतं तुला सांगायला ? सोड, सोड मला जाऊं दे गोष्टी ऐकायला ! जाऊं दे.

**माल०** नाहीं पण बाळ ! कोण येणार आहेत मला सांगायल म्हणालास ?

**विश्वा०** तू एकलेस नाहीं वाटतं ? मी नाहीं आतां सांगत जा. जाऊंदे मला.

**माल०** पण मला पुन्हां एकदां सांग पाहूं तें नांव. तुझ्या तोंडांत तें कसं गोड लागतं. म्हण गडे !

**विश्वा०** माझ्यापेक्षां तुझ्या तोंडांत फार गोड लागेल. म्हण पाहूं. ' जयवंतराव ! ' हें पहा, मी म्हणतों आणि तूंही म्हण. हं. म्हण जयवंतराव ?

**माल०** जयवंतराव !

**विश्वा०** जयवंतराव !

**माल०** जयवंतराव !

**विश्वा०** जयवंतराव !

**माल०** आतां नाहीं मी म्हणत जा.

**विश्वा०** पुन्हां एकदांच म्हण. तू कस गोड म्हणतेस. म्हण जयवंतराव! म्हण म्हण.

**माल०** जयवंतराव.

**विश्वा०** ( वेडावून ) जयवंतराव ! अरे बापरे ! आई आणि बाबा आले.

[ चंद्रावती व जगदेव येतात. ]

**जग०** मीं येतांना आणलेला घोडा थकला आहे. सुभान्या ! त्या झुंझार घोड्यावर जीन घालून तयार राख आणि हा घोडा घेऊन तूं पागाहून ये.

**चंद्रा०** आपल्याला एक पाव घटका विश्रांतीही मिळाली नाहीं.

**जग०** कसली विश्रांती आणि कसलं काय ? सूर्योदयापर्यंत अवकाश असला तरी शक्य तितक्या लौकर तिथं जाऊन पोंचलों तर त्या बिचाऱ्याची तेवढी कैद कमी होईल.

**माल०** पण एक घटका आणखी इथं काढायला कांहीं हरकत नाहीं. त्यांना थोडा वेळ जास्त बसावं लागेल इतकंच ना ? मग काय ? बसतील जरा.

**जय०** पण असं कां? एका घटकेच्या तुमच्या माझ्या सुखाकरतां त्या बिचाऱ्याला–त्या सत्पुरुषाला–बंदिवास कां? एक एक क्षण चालला आहे, तसतसं माझं चित्त कसं चुटपुटतं आहे! आतां थांबायची सोय नाहीं. हा निघालोंच मी, चंद्रावती! बाळ! [ बाहेर गडबड होते. ]

**माल०** अरे देवा! ही गडबड कसली? [ चार पांच लोक येतात. ]

**जग०** काय आहे?

**एक०** आपण परत आलां असं कळलं म्हणून आपल्या दर्शनाकरतां आलों आहोंत.

**जग०** पण हें अखेरचंच दर्शन आहे, कारण हा मी निघालोंच आहे परत जायला.

**एक०** महाराज! आपण कुठं जाणार?

**जग०** कैदखान्यांत! तुमचा जो शत्रू-शिवाजी–त्याच्या कैदखान्यांत! माझ्याकरतां ज्या सरदारानं आपले प्राण संकटांत घातले, तो ज्या कैदखान्यांत आहे, त्या कैदखान्यांत!

**एक०** आपण आणि कैदखान्यांत! छट् महाराज! आतां आपण मुळींच परत जाऊं नका! आपण पुन्हां लढाईची तयारी करून त्या शिवाजीला दे माय धरणी ठाय करायला लावूं.

**जग०** काय तुम्हीं मला सांगतां हें! परत येईन म्हणून मी ज्या वचनानं बांधला गेलों आहें, तें वचन मी मागं घेऊं? छे, छे:! ही गोष्ट कधींही होणार नाहीं!

**एक०** कसलं वचन अन् कसलं काय? शत्रूजवळ कसलं वचन?

**जग०** एक शब्दसुद्धां जास्त बोलूं नका! तुम्हीं माझ्यावरचं प्रेम व्यक्त केलंत, आपलं कर्तव्य केलंत. जर तुम्हांला माझं ऐकायचं असेल तर इतकंच करा कीं, मला आतां ज्यास्त वेळ खोळंबून ठेवूं नका आणि मी जाईन तिकडे येण्याचं धाडस करूं नका. जा तुम्ही.

**एक०** जी हुकूम. [ लोक जातात.

**चंद्रा०** सत्र थोडी आणि सोंग फार अशातलं झालं आहे.

**माल०** शिवाजी राजाला––

**चंद्रा०** मालती ! शिवाजीला राजा हीं अक्षरं या घरांत लावूं नकोस. त्याला राजा म्हटलेलं इकडं आवडत नाहीं.

**जग०** नाहीं, नाहीं. तूं बेलाशक आतां त्याला राजा म्हण. तो राजा शोभतो. त्याच्यांत राजाला लागणारे गुण आहेत. त्याच्या अंगीं राजतेज आहे. त्याच्या राज्यांतल्या कायद्याची उभारणी नीतीच्या आणि सत्याच्या पायावर केलेली आहे.

**पद २२ वें. राग बेहग, ताल त्रिवट.**

**थोर नृपति शोभे धीरवीर ।**
**खचित गमत तो शिव अवतार ॥ धृ० ॥**
**सोज्ज्वल न्याय विमल धर्माचें ।**
**नव मंदिर जणुं कीर्तिनीतिचें ॥ १ ॥**

[ सुभान्या येतो. ]

मी येतों आतां-चंद्रावती ! बाळ ! येतों. मालती ! बाळ ! चंद्रावती !—

[ सुभान्या, विश्वास व जगदेव जातात. ]

**चंद्रा०** मालती ! मी आतां करूं तरी काय ? हा जीव ठेवावा असं कांहीं मला आतां वाटत नाहीं.

**माल०** ताई, असं निराश होऊन कसं चालेल ? अजून आपल्याला कांहीं तरी प्रयत्न करतां येईल !

**चंद्रा०** काय प्रयत्न करतां येईल ? जिथं जयवंतरावांसारख्या सरदारांच्या प्रयत्नाला यश आलं नाहीं, तिथं आपल्या बायकांच्या प्रयत्नाला कोण विचारणार ?

**माल०** ताई ! मोठमोठ्या मुत्सद्यांच्या, मोठमोठ्या वीरांच्या, मोठमोठ्या साधुसंतांच्या हातून ज्या गोष्टी होत नाहींत, त्या बायकांच्या हातून सहज घडलेल्या आहेत. त्यांतून शिवाजीराजे अतिशय थोर मनाचे आहेत. स्त्रियांबद्दल त्यांच्या मनांत अत्यंत आदर आहे. आपण त्यांचं दर्शन घेऊं आणि त्यांच्या पायांजवळ जगदेवरावांच्या मुक्ततेची भिक्षा मागूं.

**चंद्रा०** असं असेल तर चल आपण जाऊं. मी आणि बाळ त्यांच्या

पायांवर लोळण घेऊं आणि एक इकडची सुटका तरी करून घेऊं, नाहीं तर तिथंच मस्तक आपटून प्राणत्याग तरी करूं !

**माल०** चल, आपण निघायची तयारी करूं. [ जातात. ]

---

# प्रवेश तिसरा.

—:*:—

## स्थळ—तुरुंग.

**जय०** ( स्वगत ) हा कंटाळवाणा काळ संपणार तरी केव्हां ? कालचा दिवस आणि रात्र अत्यंत त्रासांत गेली खरी; पण शेवटीं हातीं घेतलेल्या कामांत यश मिळालं ! खरोखर ! समाधानासारखा आनंद कशांतही नसेल. त्या आनंदांत माझी तंद्री लागून मला आतांपर्यंत कशी गाढ झोंप लागली होती. या झोंपेंतून या सूर्याच्या किरणांनीं मला जागं केलं ! सूर्यनारायणा ! तूं आपल्या प्रेमळ करांनीं अंधःकारमय सृष्टींत वास करणाऱ्या प्राण्यांना जागं करून त्यांच्या गत आणि भावी आयुष्याबद्दल त्यांना जाणीव देतोसना !

पद २३ वें. राग पटदीप, ताल त्रिवट.

**रविकर प्रेमें नटला । रे हा नव चलन दे जीवांला ॥ धृ० ॥**
**‘ गत भावी दिन ध्यानिं धर ’ वदे । गत घटि**
**पुन्हां न सदा ’ । जागे करि सकलही जीवांला ॥ १ ॥**

( तासाचे ठोके वाजतात ) काय ? या वेळीं दोन प्रहर उलटून तिसऱ्या प्रहरची वेळ आहे ? तर मग माझ्या सुटकेची वेळ जवळ येत चालली आहे. बा सूर्या ! तूं आकाशांत अगदीं उंच उंच जा आणि मला सांग, या वेळीं जगदेवराव आपल्या प्रिय माणसांच्या सहवासांत आनंदांत आहेत ना ? आपलीं सूक्ष्म किरणं मालतीच्या हृदयांत खोलखोल ने आणि सांग, मालतीच्या मनाला माझ्या या कृतीनं आनंद वाटला ना ?--पण तूं माझ्याजवळ

बोलतो आहेस म्हणून यमाजी भास्कर तुझा कडेलोट नाहींना करणार ? जा जा अगदीं अंधःकारांत दडून रहा, किंवा पाताळांत पळ आणि पुन्हां लौकर ये, पण नको ! तूं जितका जास्त वेळ लावशील तितका जगदेवरावांना आपल्या कुटुंबांत जास्त काळ काढायला सांपडेल ! आणि मालतीलाही त्यामुळें ज्यास्त आनंद होईल. मालती ! माझ्या प्रेमळ मनोवृत्ति तुझ्याशीं तन्मय झाल्या, कीं मला कसलीही शुद्ध राहत नाहीं. कैदखाना, शिरच्छेद किंवा कडेलोट माझ्या कल्पनेच्या दृष्टीलाही दिसत नाहींत. तूं माझी देवता ! तूं माझं जीवित ! तूं माझा स्वर्ग ! हा कैदखाना जरी नरक असला तरी तुझ्या नुसत्या कल्पनेच्या दर्शनानं त्याचा स्वर्ग बनतो. या स्वर्गांत भूकतहान कशाचीही गरज नसते. मालती--

पद--२४ वें. राग रामकली, ताल त्रिवट.

**कोमलांगी नाचे वसुधा गौर । घेत सुरांची लकेरी ॥ ध्रु० ॥**
**सुंदर सुस्वर गान नाभि चाले, घुमघुमलें ब्रह्मांडांत ।**
**धेक तूं प्यारी ॥ १ ॥**

[ डोळे मिटतो. शिवाजी व पहारेकरी येतात. ]

**शिवा०** काय म्हणतां ? जयवंतरावांना अन्न द्यायचं नाहीं असा किल्लेदाराचा हुकूम आहे. आश्चर्य आहे ! जयवंतराव ! किल्लेदाराचा व तुमचा आज सकाळपासून कांहीं तंटा झाला आहे का ?

**जय०** नाहीं महाराज ! सरकारच्या कोणत्याच नोकराशीं तंटा करण्याचं मला कारण नाहीं.

**शिवा०** बरं ! त्यांचा तुमचा कांहीं वांकडेपणा आहे ?

**जय०** तसाही असण्याचं कांहीं कारण मला ठाऊक नाहीं. महाराजांनीं असे प्रश्न कां केले ?

**शिवा०** मीं असं ऐकलं, कीं तुम्ही आज उपाशी आहांत. किल्लेदारांनीं तुम्हांला जेवण द्यायची बंदी केली आहे.

**जय०** पण मला आज जेवणाची आवश्यकताच नाहीं. मला त्या गोष्टीचं स्मरणसुद्धां नव्हतं. मला मुळींच भूक नाहीं.

**शिवा०** भूक असणं किंवा नसणं किंवा कैद्यानं जेवण मागणं किंवा न मागणं ही गोष्ट अगदीं निराळी आहे. पण अधिकारी आपल्या अधिकाराचा दुरुपयोग करून, भूतदयेला धुडकावून देऊन, जर लोकांना छळूं लागले तर या त्यांच्या कृत्यांना राज्यकर्त्यांनीं आळा घातलाच पाहिजे. बरं जयवंतराव ! तुमचा बिछाना कुठं आहे ?

**जय०** हा पहा सरकार !

**शिवा०** कुठं आहे ?

**जय०** काय आपल्याला दिसत नाहीं ? ही पहा फरसबंदी !

**शिवा०** आणि या फरसबंदीवर आतांपर्यंत तुम्हीं झोंप घेतलीत ?

**जय०** होय सरकार !

**शिवा०** कुठें आहे किल्लेदार ? जा त्यांना बोलावून आणा. पहारेकरी ! जगदेवराव इथं असतांना इथं बिछाना वगैरे होता तो कुठं आहे ?

**पहा०** आज सकाळीं किल्लेदाराच्या हुकमानं आम्हीं काढला सरकार !

**शिवा०** विलक्षण आहे ! जयवंतराव आमचे सरदार—आमच्या मर्जीतले सरदार—हें ठाऊक असून जर त्यांची ही बरदास्त ! तर त्या बिचाऱ्या जगदेवरावाची काय व्यवस्था करीत असतील ?

**जय०** महाराज ! मी इथं कैदी म्हणून आहें. सरकारचा पाहुणा म्हणून नाहीं !

**शिवा०** म्हणून काय झालं ! तुम्हीं ज्या जगदेवरावाबद्दल ओलीस आहां ते राजकैदी होते. अर्थात् तुम्हींही राजकैदी आहांत. राजकैद्यांकरतां ज्या गोष्टी करायच्या म्हणून आंखून दिलेल्या आहेत त्या झाल्याच पाहिजेत. आमच्या कोणच्याच कृत्यांत निष्ठुरपणा किंवा क्रूरपणा असतां कामा नये. याबद्दल मीं वेळोवेळीं अधिकाऱ्यांना ताकिदी दिल्या असून अद्याप या बाबतींत त्यांनीं सांवळागोंधळ घालावा ना ? मग आमच्या लोकांना आमच्या राज्यापेक्षां मोंगलांची किंवा विजापूरकरांचीच सत्ता जास्त प्रिय वाटेल !

**जय०** पण सरकार ! विजापूरकरांच्या क्रूरपणाची कमाल आहे. शहाजीराजांसारखे पुरुष, कीं ज्यांनीं पातशाहीच्या उलटापालटी कराव्या,— ह्या राजाला उचल, त्याला गादीवर बसव, अशा तऱ्हेचे खेळ खेळावे, ज्यांची मुत्स-

ईगिरी पाहून आपल्यासारख्यांनीं चकित व्हावं त्या शहाजीराजांना त्यांनींच बाहुलं करून गादीवर बसवलेल्या पातशहानं फक्त श्वास येण्यापुरती फट असलेल्या अंधारकोठडींत अन्नपाण्यावांचून ठेवावं ना ?

**शिवा०** पण त्या सगळ्या गोष्टींच्या मुळाशीं काय होतं ? आम्हीं ही स्वराज्यस्थापनेची घेतलेली दीक्षा सोडावी आणि पातशहाला शरण जाऊन त्याच्यापुढं लाळ घोंटणारा एक दसहजारी सरदार व्हावं ! आमची बाजू तेव्हां जरा लंगडी होती त्यामुळं मला स्वारी करून बाबांना सोडवतां आलं नाहीं. पण उत्तरेच्या मोंगलांचा बडगा जेव्हां विजापूरकरांना दाखवला तेव्हां डोळे पांढरे होऊन पटकन बाबांची मुक्तता झाली. शिवाय तो प्रकार केवळ आपसांतल्या द्वेषाचा होता. बाबांचं वर्चस्व सहन न होणाऱ्या कांहीं सरदारांनीं पातशहाच्या कानाला असा चिमटा काढला कीं शिवाजीला शहाजीराजांची फूस आहे. तेव्हां त्यांना अटकेंत ठेवावं आणि मारण्याची भीति दाखवून शिवाजीला जरब द्यावी. पातशहा पडले दीड शहाणे ! ठेवलं बाबांना अंधारकोठडींत ! [ पहारेकरी येतो. ]

**पहा०** किल्लेदारसाहेब घरीं नाहींत, कामगिरीवर गेले आहेत, असं जासूद म्हणतोय.

**शिवा०** कामगिरीवर गेले आहेत ! मग त्यांनीं आपला अधिकार कुणाच्या सूपूर्द केला आहे ?

**पहा०** कुणाच्याही नाहीं सरकार !

**शिवा०** कुणाच्याही नाहीं ! मीं ज्या शिस्ती घालून देतों त्या हीं माणसं अशा मोडून टाकतात. शिस्त लावण्याची ज्यांच्यावर जबाबदारी आहे तेच जर गैरशिस्त वागूं लागले तर आम्हीं तरी काय करणार ? तें कांहीं नाहीं. याबद्दल चांगला बंदोबस्त केला पाहिजे. पहारेकरी ! कुणाला तरी पाठवून जयवंतरावाच्या जेवणाची अगोदर व्यवस्था करा. आणि किल्लेदार आले, कीं मला येऊन गपचिप वर्दी द्या.

**पहा०** जी सरकार !

**शिवा०** जयवंतराव ! कैदखाना तुम्हांला कसा काय वाटला ?

**जय०** अत्यंत सुखकर. लोकांच्या गजबजींत राहण्याची ज्यांना संवय

आहे त्यांना चार दिवस इथं आरामच वाटेल! मला तर हा कैदखाना आहे असं वाटतच नाहीं!

**शिवा०** जयवंतराव, अत्यंत उदात्त हेतू दृष्टीसमोर ठेवून त्यांचा ज्यांना सारखा निदिध्यास लागला आहे, अशा थोर विभूतींना, कैदखान्यांत ठेवा, अंधारकोठडींत ठेवा, किंवा समुद्रांतल्या एखाद्या बेटांत ठेवा, त्यांना तो राजवाडाच आहे! त्यांचं मन उदात्त! त्यांचे विचार उदात्त! त्यांची कृती उदात्त! ते मोकळे असले तरी सारखे आणि बंदींत असले तरी सारखेच! त्यांच्या इच्छाशक्तीनं ते आपले विचार सर्व देशांत पसरून राष्ट्राला उच्चदशेला आणण्याचा प्रयत्न करतात. तें पहा तुमचं ताट तयार आहे. उपास सोडा आणि मग हृदयांत राष्ट्रकार्याच्या देवतेची स्थापना करून कांहीं काळ स्वस्थ समाधी लावा.

[ सर्व जातात. ]

## प्रवेश चवथा.



**स्थळ—जंगलांतील एक खिंड.**

[ यमाजीभास्कर व चार पांच मारेकरी. ]

**यमा०** हें पहा, गड्यांनो! तुम्ही असेच दबा धरून बसा, आणि जगदेवराव या खिंडींत आला, कीं लागलाच चारी बाजूंनीं त्याच्यावर हल्ला करा. ल्या जशा वाघाला कोंडतात तसा त्याला घेरा बरं! आतां पाहूं तुम्ही कसें करतां तें. जरा तुमची तालीम घेतों.—पहा मी होतों जगदेव आणि तुम्हीं करा माझ्यावर हल्ला.—( खिंडींतून जगदेवासारखा येतो. लोक हल्ला करतात ) बापरे! अरे असे मारूं नका मला! अरे थांबा, हात आटपा! अरे मी जगदेवराव नाहीं! सोडा सोडा मला! अरे! मला नेतां कुठं? अरे! बांधूं नका? अरे तुम्हांला वेड लागलं कीं काय? अरेच्या! अरे मी यमाजीभास्कर आहें! [ त्याला सोडतात. ] वाः खूप केलीत! ही का तालीम? बरं झालं. तुमच्यापैकीं कुणाला मीं यमाजीभास्कर केलं नाहीं तर त्या हरामखोर यमाजी-

भास्करानं मला ठार करायचा हुकूम केला असता ! आणि मग साथ तालमी ऐवजीं रंगित तालीमच झाली असती !-ती पहा चाहूल ऐकूं येते चला. बसा दबा धरून मघांसारखे.

[ सर्व दबा धरून बसतात जगदेवराव व कुडबुडया जोशाच्या वेषांत तोहमतराव येतो. ]

**तोह०** हें पहा दादा ! इथून किल्ला अगदीं एका हाकेवर आला. बघ कशी जवळची वाट दाखवली ! दादाचं दोंद वाढलगा दादा खिंडीमध्यें आल यगा ! [ खूण करतो. लोक एकदम जगदेवावर हल्ला करतात. ]

**जग०** अरे घात झाला ! या हरामखोर कुडबुडयानं दगा केला ! या वेळे नर तरवार असती—

**यमा०** आत्याबाईला मिशा असत्या तर काकाच म्हटलं असतं ! पकड याला ! ठेवा बांधून !

**जग०** यमाजी ! तुझा आवाज मीं ओळखला. अरे हरामखोरा !—

पद २५ वें. राग मल्हार, ताल एक्का.

**नीचा, नच लज्जा कैसी । टोंचुनि मज क्लेश देशि पापराशी**
**॥ धृ० ॥सकल जगत विसंवादि । कणकण भासत विरोधि ।**
**सज्जनावरी उठती नरकवासी । जखडुनी यमपाशीं ॥ १ ॥**

शेवटीं असा दावा साधलास अं: ! तूं जरा जवळ ये, म्हणजे एका बुक्कीनें तुझी यमाजीभास्कराकडे रवानगी करतों ! आतां कुठली वेळेवर पोंहचण्याची आशा ! जयवंतराव ! तुझी काय रे अवस्था होईल ?

**यमा०** त्याची तुला नको काळजी. त्याची काळजी हा यमाजीभास्कर बरोबर घेईल. हं बांधा याला त्या झाडाला. [ लोक जगदेवरावास बांधतात तोहमतराव ! तुम्हीं इथं याच्यावर पहारा करीत बसा आम्हीं जातों आतां.

[ यमाजी व बाकीचे मारेकरी जातात.

**तोह०** कां जगदेवराव ! तुमचा घोडा कुठं बरं पळाला असेल ?

**जग०** अरे हरामखोरा ! कुडबुडया जोशाचं सोंग घेऊन मला फसवलं अं.—देवा ! हें जग पाजीपणानं व्यापून टाकलं आहे. या जमिनीच्या एका एक कणांत पाजीपणा भरलेला आहे. या वाऱ्याच्या प्रत्येक झुळकेंत पाजीपणा

चांदतो आहे. या अंधकाराच्या अणुरेणूंतून पाजीपणा दडलेला आहे. या पाजीपणाची या दुनियेंतून ज्या वेळीं उचलबांगडी होईल, त्याच वेळीं, परमेश्वरा! सात्त्विक मनोवृत्तींना स्वैर संचार करायला अवसर सांपडेल! राज्यसंस्थापना करणाऱ्या शिवाजीच्या आसपास या यमाजीच्या रूपानं हा पाजीपणा राजरोस वावरावाना ?विजापूरच्या दरबारांत आमच्याच जातभाईच्या रूपानें हा पाजीपणा धुमसत असावाना? परमेश्वरा! या पाजीपणाच्या प्रत्यक्ष मूर्तीशीं–या सोंगाड्या कुडबुड्याशीं–या ढोंगी पहारेकऱ्याशीं बोलण्याची सुद्धां वासना मला देऊं नकोस.–जयवंतरावांच्या मनाची या वेळीं काय स्थिति झाली असेल! मी आतां येईन मग येईन म्हणून त्याचे माझ्याकडे डोळे लागून राहिले असतील! कदाचित् मी येणार नाहीं अशीही त्याची समजूत झाली असेल. जयवंतराव तू मला दोष देत असशील पण या चांडाळांनीं माझी काय अवस्था केली आहे, याची जर तुला कल्पना झाली तर तुला माझी कींव आल्यावांचून राहणार नाहीं! मी सूर्योदयाच्या आंत जर तुझ्याजवळ आलों नाहीं तर ते चांडाळ तुझा कडेलोट—अरेरे! हा विचार सुद्धां मनाला सहन होत नाहीं.

**तोह॰** जगदेवराव! आतां दुःख करून काय करायचं! दैवाच्या हातच्या गोष्टी आहेत ह्या. अहो! नशिबापुढं कुणालाही जाववत नाहीं!

**जग॰** खरं बोललास. आणि म्हणूनच तुझ्यासारख्या हलकट माणसाच्या बोलण्यावर विश्वास ठेवून हा प्रसंग मीं आपण होऊन ओढवून घेतला!

**तोह॰** पण मीं तुमचं सगळं भूतभविष्य कसं बरोबर सांगितलं, का? माझं सोंग कसं काय वठलं?

**जग॰** माझ्यासारखा मनुष्य तुझ्या सोंगाला बळी पडला, तेव्हां तें सोंग उत्तम साधलं हें उघड आहे. पण त्यानं माझा मात्र सर्वस्वी घात केला. माझं चरित्र आणि नुकत्याच घडलेल्या गोष्टी जर एखाद्या अगदीं अनोळखी गृहस्थानं सांगितल्या तर तो ज्योतिषी आहे असं कुणाला वाटणार नाहीं? तुझ्यासारख्या आपमतलबी ढोंगी ज्योतिष्यावर भरंवसा ठेवून आजपर्यंत कितीक लोकांनीं आपलं नुकसान करून घेतलं असेल. माझा जर घोडा पळाला नसता तर मी या वाटेनं आलों नसतों आणि तुझ्या हातांत कधींच सांपडलों नसतों!

**तोह०** पण तुमचा घोडा तरी कुणीं उडवला ? आम्हींच कीं ना आणि तुमचा घोडा तुमच्या जवळ असता, तरी वाटेल ती युक्ति करून तुम्हाला चकवलं असतं. अहो ! हा तोहमराव म्हणजे असा तसा न लहानपणापासून मी मोठा लुच्चा ! शाळेंतल्या सगळ्या मुलांच्या चहाड पंतोजींना सांगायचा. एखाद्या मुलाशीं माझं वांकडं आलं, कीं, रचलं त्याच्यावर किटाळ आणि दिलीच त्याला पंतोजीकडून घोडी ! आतां तरी का किल्लयावरचे सगळे लोक मला भितात. सरकारी कामावर असो नसो, एखा द्याशीं माझं वांकडं आलं, कीं त्याच्यावर कांहीं तरी आळ घालून यमाज भास्करापुढं त्याला उभा करतों. आज पहा आतां या कामाबद्दल यमाजि भास्कराकडून मला चांगली बढतीची जागा मिळेल !

**जग०** बस्स कर बाबा तुझं चऱ्हाट ! मला स्वस्थ तरी राहूं दे !

**तोह०** हें होणंच शक्य नाहीं. कारण, मी तरी इथं एकटा गप्प कि बेळ बसूं ? शिवाय असा बसलों तर मला लवंडायची बुद्धि व्हायची; आणि म झोंप लागून फसगत व्हायची ! बाकी जागा असल्यावर मी कधींच फसण नाहीं. प्रत्यक्ष ब्रह्मदेव आला तरीं फसायचा नाहीं.

[ हिकमत कडकलक्ष्मीच्या वेषांत येतो. ]

**हिक०** ( स्वगत ) शाबास ! जागा तर सांपडली ! आणि या हराम खोराचीही गांठ पडली. अरे ! या चोरानं जगदेवरावाला झाडाशीं बांधून ठे आहे. ( उघड ) सुभानराव ! अहो सुभानराव ! ते पहा तुमचे धनीसाहेब ते झाडाशीं बांधलेले. तो घोडा तिथंच उभा ठेवा. मी या हरामखोराला गुंत वून ठेवतों. तुम्ही संधि साधा आणि जगदेवरावाला सोडवून या घोड्यावर लावून. घोडा गडावरचा आहे. त्याला वाट दाखवायला कोणीच नको. त जगदेवरावाला थेट गडावर घेऊन जाईल. ( सुभान्या जातो. ) कोन बसल हायेस र दादा ?

**तोह०** मी कुडबुड्या जोशी हाय.

**हिक०** काय लुडबुड्या ?

**तोह०** तसं नव्ह. कुडबुड्या जोशी मला म्हंगत्यात.

**हिक०** हं हं बडबड्या जोशी ?

तोह० अर बडबड्या न्हव. म्या सांगतोयाना, कीं मासनी कुडबुड्या जोशी म्हंगत्यात.

हिक० हं आतां समजलों बगा. तूं बुडबुड्या जोशी हैस, पान्याचा बुडबुडा जसा फुटकन फुटतो तसा तुझा जोशीपनाबी बुडकन बुडतो.

तोह० अर बाबा कुडबुड्या जोशी मी हाय.

हिक० अर लुडबुड्या, बुडबुड्या, बडबड्या आन कुडबुड्या, समद एकच. मंग कुडबुडेबुवा ! करा कीं वाईच बडबड. म्हंग—' दादाचं दोंद वाढलगा, डोळयाचं पांग फेडलगा. हं सांगा कीं आमचं भाकीत !

तोह० त्ये खरं पन तू हायेस कोन ? दादा हैस का दादी हैस ? ह्ये अगुदर पाह्यला व्हॊवं.

हिक० मी कडकलक्ष्मी हैं, पहा की !

तोह० त्ये खरं, पन तूं बाप्या हायेस का बायकू हायेस ! ह्यो लुगड्याचा घागरा, ह्ये लंबेलंबे डोईचे केस, हा कुकवाचा मळवट, यावरनं तर बग तूं बायकु हायेससं वाटतं

हिक० पन ह्या वरच्या स्वांगावर जाऊ नका. आतमंदला परकार अगदीं न्यारा हे. ही मिशी बगा की !

तोह० मी तरी त्येंच म्हनतों. मग तुसनी काय म्हनू ' अग म्हनू का ' अर ' म्हनू ?

हिक० कायबी म्हंगा पन माझं भाकीत सांगा की.

तोह० मंग दोनीबी म्हनतो–दादाचं दोंद वाढलगा ! बयेचं प्वाट फुगलगा ! दादाचं मूल व्हाइलगा ! बयेची पोर गाइलगा !–ह्ये बग तुस्नी विपुल धन हाये. धंदा चांगला व्हनार बग. तुला मूलबी व्हईल पन एक आड येतया. एक नड हाये तेवढी काढून टाक. समद गिर ब्येस हायती बग. आंवदा तुझा शुकुर लय चांगला हाये. अन गुरु बग बारावा आला हाय.

हिक० काय बारावा आलाय ?

तोह० हा. त्यो खूप देईल बग-अन तुझ्या उदरी शनीबी आलाया. झाले बग आतां. दादाचं दोंद वाढलगा--बयेचं प्वाट फुगलगा.

[ नाचूं लागतो. ]

**हिक०** ( त्याच्या बरोबर नाचून ) कडक लक्ष्मी ! कडक लक्ष्मी ! आंगीं आली आंगीं आली ! जय भवानी ! जय भवानी !

[ वारें आंगांत आल्याचा बहाणा करून नाचत

**तोह०** ( घाबरून ) हे भवानी ! कडकलक्ष्मी शांत हो शांत

**हिक०** ( अंगांत येऊन ) तूं स्वांग घेऊन माझ्या भगताला प बलास बग. तुझ्यावर आपत येईल. उद्यां सकाळच्या वख्तीं तुजा मुरुत्यु ह

**तोह०** हे देवी ! माफ कर, माफ कर.

**हिक०**

**ये सुभान्या ! ये सुभान्या ! उडव दोरा ! सोड भरारा !**
**घे घोडा ! धो धो दौडा ! जय भवानी ! कडक भवानी !**

[ वरील गाणें चाललें असतांना हिकमती आसूड घेऊन तोहमताच भोंवतीं फिरतो. व सुभान्या येऊन जगदेवास सोडवतो. ]

**सुभा०** दौडा दौडा. धनीसाहेब ! घोडा गडावरचा हाये. तुमास थेट गडावर घेऊनश्यान जाईल.

**जग०** शाबास. हा चाललों पहा. [ जगदेव धांवत जातो.

**तोह०** घात झाला.

**हिक०**
**सुभा०** } खबरदार. [ दोघे दोहोंकडून तरवारी रोंखतात. ]

[ पडदा पडतो. ]

## अंक तिसरा समाप्त.

# अंक चवथा.

## प्रवेश पहिला.

—:०:—

**स्थळ**—शिवाजीचा दिवाणखाना.

[ शिवाजी व मालती. ]

**शिवा०** मालती ! मला जगदेवरावाच्या कुटुंबाला भेटतां येत नाहीं- कारण त्यांना भेट देऊन कांहीं उपयोग नाहीं.

**माल०** उपयोग असो नसो आपण त्यांना दर्शन द्याच. दर्शनाला आले- ना क्षुद्र माणसाला सुद्धां देव दर्शन दिल्यावांचून राहत नाहीं.

**शिवा०** इतका मोठेपणा मला नको आहे. लोकांनीं देव्हाऱ्यासारखं मला व मानणें आणि माझ्या भजनीं लागणं मला मुळींच पसंत नाहीं. शिवाय धिकार नसतांना उगीच देवपणाचं सोंगही मला करतां येत नाहीं.

**माल०** थोरांना नेहमीं असंच वाटतं, आणि त्यांतच त्यांचा थोरपणा सतो. महाराज ! आपल्या आतांपर्यंतच्या चरित्राचा विचार केला तर तें लौकिक नाहीं असं कोण म्हणेल ? आपल्या हातून घडलेलीं अद्भुत कृत्यं ध्यांत घेतलीं तर तीं दैवीकृत्यं नाहींत असं कुणाला वाटेल ? आपल्या लौकिक सामर्थ्याची कल्पना केली तर आपण परमेश्वरी अवतार नाहीं असं ोण बोलेल ? महाराज ! आपण अवतारी पुरुष आहां असाच सगळ्यांचा मज आहे आणि तो खराही आहे.

**शिवा०** मालती ! गोड गोड बोलून मला वळवायला कितीही पाहि- स तरी मी कांहीं फसायचा नाहीं !

**माल०** सरकार ! मी आपल्याला काय फसवणार ? ज्ञानांत, पराक्रमांत गर राजकारणांत आपली बरोबरी करणारा एकही पुरुष सगळ्या हिंदुस्था- त नाहीं असा आपला चहूंकडे लौकिक आहे, विजापूर, गोवळकोंड्याला

आपण निर्माल्यवत करून टाकलं आहे. दिल्लीच्या अवरंगजेबाला थ
प्यायला लावलं आहे, आणि मोठमोठ्या रजपूत राजांना सुद्धां तोंडात
घालायला लावलं आहे. मी एक अजाण पोर! मी आपल्याला काय फसव

**शिवा०** काय फसवणार–काय फसवणार करूनच मतलबी लोक
घालून आपला कावा साधून घेतात. ज्या ठिकाणीं वादविवादाचा किंवा
गाचा कांहीं उपयोग नसतो त्या ठिकाणीं पडून घर घेणं यांतच मुत्सद्दी
असतो. मालती! हा मुत्सद्दीपणा तुला चांगला साधला आहे. मग आप
पक्षकाराची बाजू जोरानं पुढं मांड आणि आपल्या बाजूचा निकाल करून

**माल०** पण सरकार! अशा तऱ्हेनं जोरानं बाजू मांडण्याचं सा
माझ्या अंगीं कुठं आहे? आणि असलं तरी त्याचा इथं काय उपयोग अ
न्याय देणारे न्यायाधीश आपण आहां. आपल्या सर्वस्वी मर्जीची ती गोष्ट
आमची आपल्यावर देवासारखी निष्ठा आहे! आपले आह्मी भक्त आहो
भक्ताचा प्रेमळपणा कितपत सत्य आहे, हें जाणण्याची शक्ति देवांत अ
जगदेवरावाच्या कुटुंबाला–माझ्या ताईला आणि तिच्या दुर्दैवी मुलाला
कारनीं दर्शन द्यावंच!

**शिवा०** पण दर्शन देऊन काय करूं? ते माझ्याजवळ जगदेवराव
मुक्त करा म्हणून विनंति करणार, आणि ती विनंति मला तर मान्य क
येत नाहीं. तूं मला देव म्हणतेस. दर्शनाला आलेल्याला संतुष्ट करण्य
सामर्थ्य जर देवाच्या अंगीं असेल तरच त्यानं भक्ताला दर्शन द्यावं! अ
मला तर कांहींच करतां येत नाहीं.

**माल०** महाराज! एक साधी गोष्ट करायला आपण इतके आढेवेढे घे
षं? जगदेवरावांना आपण मुक्त करा, अगर करूं नका, त्यांना जिवंत ठे
अगर ठेवूं नका, यांच्या दीनदुबळ्या बायकापोरांची विनंति मान्य करा, कि
करूं नका. पण एकच गोष्ट मी सांगतें, तेवढी ऐका. ताई आणि बाळ विश्व
यांना पायांचं दर्शन द्या. त्यांच्या दैवीं जें असेल तें होईलच; पण शिवाजी
महाराजांनीं दोन अनाथ प्राणी दाराशीं आले असतां, त्यांना लाथाडून दिल
असा अमानुषपणाचा–राक्षसीपणाचा आरोप आपल्यावर नको यायला.

**शिवा०** पण आतां मध्यरात्र उलटून पहाटेची वेळ होत आली आहे. आ

त्यांना जरा विश्रांति घेऊं दे. मग सकाळीं देवानं मला बुद्धि दिली, माझ्यांत जर कांहीं देवपण आलं तर घेईन त्यांचं दर्शन ! जा. त्यांना आतां जरा झोंप घेऊं दे.

**माल०** महाराज ! आपला कनवाळूपणा अलौकिक आहे. आपण त्यांना झोंप घ्यायला सांगतां पण त्यांना झोंप येणार कशी ? मनावर पडलेलं दुःखाचं दडपण त्यांना झोंप घेऊं देईल का ? त्यांच्या दृष्टीपुढं उभं असलेलं दुर्दैवाचं भयाण चित्र त्यांना स्वस्थ पडूं देईल का ?

[ जासूद येतो. ]

**जासू०** सरकार ! किल्लेदारसाहेब आतांच आले, आणि त्यांनीं जयवंतरावांना टकमकीच्या कड्याकडे घेऊन जाण्याचा हुकूम सोडला आहे.

**शिवा०** कां बरं ! जगदेवराव अद्याप आले नाहींत का ?

**जासू०** नाहीं सरकार. किल्लेदारसाहेब ह्मणत होते, कीं ते येणारही नाहींत.

**माल०** सरकार ! जगदेवराव आमच्या कितीतरी अगोदर निघाले, ते संध्याकाळबरोबर इथं यायला पाहिजे होते. ते निघाल्यावर किती तरी वेळानें आह्मी निघालों. महाराज ! आपण नीट चौकशी करावी.

**शिवा०** आजचा दिवस मोठा वाईट दिसतो आहे. हें पहा, एखादा स्वार पाठवून जगदेवरावांचा तपास करा, आणि जयवंतरावांना किल्लेदार टकमकीकडे नेऊं लागले कीं, मला सूचना द्या, जा.

**जासू०** जी हुकूम ! [ जासूद जातो. ]

**माल०** सरकार ! एक विनंति आहे.

**शिवा०** तुझी काय विनंति आहे ती मला कळलेलीच आहे. जगदेवरावांच्या बायकापोरांना दर्शन द्या, हीच ना ?

**माल०** महाराज ! त्यांना तर दर्शन द्याच, पण त्यांच्याकरतां— माझ्या शब्दाकरतां–ज्यानं आपल्या जिवावर भयंकर संकट ओढवून घेतलं आहे त्या महात्म्याचं दर्शन घेण्याची मला परवानगी द्या.

**शिवा०** कुणाचं दर्शन तुला पाहिजे ! कोण महात्मा !

**माल०** जयवंतराव !–जयवंतरावांचं दर्शन मला पाहिजे आहे.

**शिवा०** मालती !

**माल०** महाराज ! आश्चर्य वाटूं देऊं नका. मी लज्जा, विनय बाजूला ठेवून बोलतें असं समजूं नका ! मला जयवंतरावाची भेट घेऊं द्या. महाराज ! आम्हीं दोघं—

**शिवा०** मालती ! माझ्या सगळं कांहीं लक्षांत आलं ! हा शिवाजी राजकारणाच्या कोरड्या वातावरणांत वास करून शत्रूच्या मुत्सद्यांचीं अंतःकरणं जरी निरखून पहाण्यांत गुंग असला, किंवा युद्धाच्या धुमश्चक्रींत शिरून प्रतिस्पर्धी वीरांच्या हालचाली काय आहेत, त्याची टेहळणी करण्यांत मग्न असला तरी प्रणयीप्रणयिनींचीं हृदयं ओळखण्यांत तो अज्ञ नाहीं. जा–जा–आपल्या प्रियकराची भेट घे.

**माल०** महाराज ! आपण मला परवानगी दिली, हें आपल्या थोरपणाला शोभण्यासारखंच आहे. पण सर्वांचींच अंतःकरणं इतकीं थोर नसतात. महाराज ! किल्लेदाराचं नांव यमाजीभास्कर आहे.

**शिवा०** आणि तो प्रत्यक्ष यम असला म्हणून काय झालं ? माझा परवाना नेऊन त्याला दाखीव म्हणजे तुला नाहीं म्हणण्याची त्याची प्राज्ञाच नाहीं. कोण आहेरे ! ( एक हुजऱ्या येतो ) चिटणिसांना सांग, जयवंतरावाची तुरुंगांत भेट घ्यायचा यांना परवाना द्या.

**माल०** मी येतें सरकार. [ मालती व हुजऱ्या जातात. ]

**शिवा०** गेली एकदां ! मला वाटलं ही आतां जगदेवरावाच्या कुटुंबाची भेट घ्यायचं मीं कबूल केल्यावांचून कांहीं इथून जात नाहीं. पण अचानक जयवंतरावाबद्दलची बातमी आली आणि तिला त्यांना भेटायला जाण्याची उत्कंठा लागून माझी सुटका झाली.—पण हें काय ? जगदेवराव अद्याप कसे आले नाहींत ? मालती म्हणते, कीं ते संध्याकाळींच यायला पाहिजे होते. मग ते कुठं अडकून पडले ?—बरं, किल्लेदाराचाही आतांपर्यंत पत्ता नव्हता.—अजून प्रहरभर रात्र आहे. जगदेवराव तेवढ्या मुदतींत येत आहेत कां पाहूं !—अरे पण हें काय?

[ माळती, चंद्रावती व विश्वास येतात. ]

**माल०** सरकार ! यांना आपल्या पायांवर घातलं आहे, आतां मारणार आणि तारणार आपणच आहां ! [ मालती एकदम निघून जाते ]

**चंद्रा०** ( पायां पडून ) महाराज मी कां आलें—

**शिवा०** हें पहा बाई तुम्ही कां आलां आणि आतां काय बोलणार आहां हें सगळं मला कळून चुकलेलं आहे ! तुह्माला उगीच जास्त श्रम मी कशाला देऊं ? मी एकच सांगतों, जगदेवरावांची सुटका मला करतां येत नाहीं.

**चंद्रा०** तीं कां ? त्यांचा गुन्हा इतका जबरदस्त आहे का ? त्यांनीं आपला गुन्हा तरी केला आहे का ? -स्वतःच्या अब्रूचं-स्वतःच्या जहागिरीचं स्वतःच्या अन्नदात्याचं-रक्षण करण्याकरितां त्यांनीं तरवार उचलली हा त्यांचा अपराध आहे का ? आपल्या मनोदेवतेला स्मरून तें वागले ही त्यांची चूक आहे का ?

**शिवा०** एवढ्यापुरतंच जर पाहिलं तर ही त्यांची चूकहीं नाहीं, आणि हा त्यांचा अपराधही नाहीं; पण त्यांच्या एवढ्याशा कृतीचा सर्व राष्ट्रावर जो परिणाम होतो तोच अत्यंत घातुक आहे. महाराष्ट्राला स्वतंत्रता मिळण्याच्या आड ज्या गोष्टी येत असतील त्यांचा निकाल लावलाच पाहिजे. भवानीच्या आज्ञेनं तें काम माझ्याकडे आलेलं आहे. जगदेवरावांनीं विजापूरकरांच्या तर्फेनं आमच्यावर तरवार उचलणं व आमच्या स्वराज्याच्या वृक्षाचा मुळांतच नाश करणं आमच्या मतानं देशद्रोह आहे. त्या देशद्रोहाच्या गुन्ह्याबद्दल देश त्यांना जी शिक्षा देत आहे किंवा देईल ती त्यांना भोगणं भाग आहे.

**चंद्रा०** पण महाराज ! अशा तऱ्हेनं जन्मभर जरी त्यांना कैद-खान्यांत कोंडून ठेवलंत, त्यांच्या जिवाचे हाल हाल केलेत, त्यांच्या मनाला शक्य तितक्या वेदना दिल्यात, तरी ते तुम्हाला मुळींच अनुकूल होणार नाहींत. त्यांचा निश्चय कधींही ढळायचा नाहीं. जिवांत जीव असेपर्यंत ते तुमचे शत्रुच राहणार !

**शिवा०** मग तुह्मीच सांगा, असल्या शत्रूला मोकळं सोडून त्याला पुन्हां तयारी करून लढाईला येण्याची संधि देणं चांगलं का ? हा आपणच होऊन आपल्या हातानं आपल्या पायांवर धोंडा पाडून घेणं नव्हे का ?

**चंद्रा०** मग त्यांच्या बाबतींत आपण विचार तरी काय ठरवला आहे ? त्यांना जन्मभर हालअपेष्टा भोगीत अंधारकोठडींत ठेवणार कीं काय

**शिवा०** शत्रूला समोर ठेवून नेहमीं धाकधुकींत आयुष्य निघणं श

नाहीं. कांहीं दिवस प्रयत्न करून पाहूं. जर ते आम्हाला वश झाले तर ठीकच, नाहीं तर शेवटीं—

**चंद्रा०** शेवटीं काय ?-शेवटीं काय करणार आहां ?

**शिवा०** त्यांचा शिरच्छेद करणं भाग आहे !

**चंद्रा०** अरे देवा ! हें काय भयंकर-मी ऐकतें आहें ! नका—महाराज ! असे निष्ठुरपणाचे शब्द काढूं नका. हे शब्द माझ्या हृदयांत शिरून माझं हृदय पिळवटून टाकताहेत. बाळ विश्वास ! ठेव-ठेव यांच्या पायांवर मस्तक आणि आपल्या वडिलांच्या प्राणाबद्दल भिक्षा माग !

**विश्वा०** भिक्षा काय म्हणून ? मी नामर्द का आहें ? तूं रडूं नकोस. हे जर माझ्या बाबांना सोडीत नसले तर मी स्वारी करून त्यांना सोडवून नेईन. भिक्षा काय म्हणून ?

**शिवा०** शाबास ! खरा सिंहाचा बच्चा आहे ! बाळ ! तूं माझ्या जवळ राहतोस का ?

**विश्वा०** तुम्ही माझ्या बाबांना सोडतां का ?

**शिवा०** तें मग सांगेन.

**विश्वा०** मग मीही बाबांना विचारून मगच सांगेन. हासतासे ? मला बाबांना विचारायला नको का ? सगळेच कांहीं वडिलांच्या विरुद्ध वागणारे नसतात.

**शिवा०** मग बाळ ! मी जर वडिलांच्या उलट वागत असलों तर तूं मला काय म्हणशील ?

**विश्वा०** अगदीं वाईट मुलगा आहेस असं म्हणेन. तुझं बापावर प्रेम नाहीं असं म्हणेन. तुझ्या बाबांनीं तुला पकडून नेलं पाहिजे, तुझी पाठ चाबकांनीं फोडली पाहिजे असं म्हणेन.

**चंद्रा०** हं बाळ असं बोलूं नये. आपल्या वडिलांबद्दल—

**शिवा०** बाई ! बोलूं द्या त्याला. त्याचं बोलणं मला आवडतं ! बाळ ! बोलरे असंच कांहीं तरी.

**विश्वा०** वाः ! म्हणजे मी काय भाट आहें कीं काय तो आपला बडबडत बसूं ? मग काय तुम्हीं माझ्या बाबांना सोडतां कां नाहीं ?

**शिवा०** छत्! मुळींच नाहीं–मुळींच सोडणार नाहीं! उलट त्याचं डोकं उडवून देणार आहें.

**विश्वा०** मग हें पहा तुझंच डोकं उडवतों. [ तरवार उपसून शिवाजीवर धांवतो व चंद्रावती त्याला आडवते. ]

**शिवा०** अरेरे! असला बाणा, असलं रक्त, असला अभिमान फुकट गमावीतना! जर एव्हांपासून याला वळण मिळून हे गुण महाराष्ट्राच्या कामीं लागतील तर यक्षिणीची कांडी फिरल्याप्रमाणं एका क्षणांत महाराष्ट्र स्वतंत्र होईल.

**चंद्रा०** महाराज! आपण जर महाराष्ट्राच्या स्वातंत्र्याची एवढी काळजी वाळगतां तर आपणांस स्वातंत्र्याची खरी किंमत माहित असलीच पाहिजे.

**विश्वा०** मलासुद्धां चांगली ठाऊक आहे. बाबा कैदेंत आहेत असं कळल्यावरोबर मीं आमच्या घरचीं पिंजऱ्यांत ठेवलेलीं सगळीं पाखरं सोडून दिलीं. गरीब बिचाऱ्या पाखरांना कैद काय म्हणून? आणि माझ्या बाबांना तरी कैद काय म्हणून! तुह्मी माझ्या बाबांना सोडून द्या.

**चंद्रा०** महाराज! या अनाथ मुलाच्या विनवणीकडे लक्ष द्या. माझ्या अभागिणीच्या प्रार्थनेकडे डोळेझांक करूं नका! आपण त्यांचा शिरच्छेद करून काय मिळवणार? त्यांच्या अनाथ पत्नीच्या आरोळ्या आणि त्यांच्या पोरक्या पोराचे विलाप हीं ऐकून आपल्या अंतःकरणाला वेदना होतील आणि मग आपल्या अविचारी कृत्यामुळं स्वर्गांत गेलेला आत्मा त्या मृतदेहांत परत आणण्याचं सामर्थ्य अंगीं नसल्यामुळं आपणच आपल्याला शिव्याशाप देऊं लागाल!

**शिवा०** बाई! माझं हृदय इतकं कोवळं नाहीं. मीं आपल्या सोळाव्या वर्षीं लढवय्याचा पेशा पत्करला! तेव्हांपासून आज एकवीस वर्षांत माझ्या या तरवारीला हजारों माणसं बळी पडलीं असतील! हृदयाला भेदून टाकणारे वैधव्यांचे विलाप, सर्वस्वावर कुऱ्हाड पडल्यामुळं त्यांनीं उच्चारलेले तळतळाट किंवा अनाथ बापड्या मुलांचे फत्तरालाही पाझर फोडणारे हुंदके मीं ऐकले आहेत. पण त्यांचा माझ्या मनावर यत्किंचितही परिणाम झाला नाहीं. पित्याची आज्ञा मीं मानली नाहीं किंवा त्याच्या रागाचीही पर्वा केली नाहीं. बायका-पोरांच्या सुखदुःखाकडे लक्ष द्यायला मला फुरसतच झाली नाहीं. माझे सगळे

विचार–माझ्या सगळ्या मनोवृत्ती–एकाच गोष्टीकडे लागलेल्या आहेत. त्या ए गोष्टीच्या पूर्ततेकरतां मी रात्रंदिवस धडपडत आहें. ती गोष्ट घडवून आणण्या सगळं पुण्य सगळा पराक्रम आहे असा माझा विश्वास आहे. ती गोष्ट म्हण स्वदेश ! स्वदेशप्रीतीवांचून या जगांत प्रीति नाहीं ! स्वदेशभक्तीवांचून क कोंही भक्ती नाहीं आणि स्वदेशाभिमानाइतका मी कशांत अभिमान बाळगी नाहीं. आई, बाप, मुलगा हीं नातीं स्वदेशप्रीतीपुढं रद्द आहेत.

**चंद्रा०** महाराज ! हें सगळं खरं आहे; पण जन्मदात्या आईबापांबद्दल पाठीवर पाय देऊन आलेल्या भावंडांबद्दल किंवा पोटीं जन्मलेल्या बालकाबद्द मनुष्याच्या रक्तांत असलेलं नैसर्गिक प्रेम कधीं तरी लुप्त होईल का ? विश्वा साच्या वडिलांचं त्याच्यावरचं प्रेम सुटेल का ? किंवा विश्वासाच्या अंतःकरणांत त्याच्या वडिलांवरचं प्रेम कधींतरी निघून जाईल का ?

**विश्वा०** माझ्या बाबावरचं माझं प्रेम मला विजापूरचा बादशहा केला तरी मी सोडणार नाहीं.

**शिवा०** स्वदेश माझा देव ! स्वदेश माझे आईबाप ! स्वदेश माझीं मुलं या दृष्टीनं स्वदेशाकडे पाहिलं आणि मनुष्याची समाधि लागली, म्हणजे मुला मेल्याचं दुःख होणार नाहीं, आई वारल्याबद्दल वेदना होणार नाहींत, किंवा बाप हा लोक सोडून गेल्याबद्दल—

[ चिटणीस येतात. ]

**चिट०** महाराज ! आपले वडील आपल्याला सोडून गेले ! शहाजी राजे इहलोकची यात्रा पुरी करून स्वर्गाला गेले !

**शिवा०** काय–काय म्हणतां तुम्हीं ? माझी थट्टा तर—

**चिट०** महाराज ! थट्टा नाहीं. हा आतांच सांडणीस्वारानं लखोटा आणला ! शहाजीराजे रानांत शिकारीला गेले असतांना घोड्यावरून पडून त्यांचा एकाएकी अंत झाला !

**शिवा०** बाबा ! तुम्हीं मला सोडून गेलां ना ?

[ एकदम बेशुद्ध पडतो. ]

**विश्वा०**
**चंद्रा०**
**चिट०** } अरेरे ! यांना काय झालं [ जवळ जाऊन सर्व शुद्धीवर आणण्याचा प्रयत्न करतात. ]



विश्वास:—मग हें पहा तुमचंच डोकं उडवतों.

[ प्र १०

**शिवा०** [ शुद्धीवर येऊन इकडे तिकडे पाहून विश्वासास कवटाळून ] बाळ! आहे, तुझं म्हणणं सत्य आहे. स्वदेशप्रेमाच्या समाधींतसुद्धां पितृप्रेमाची विद्युल्लता चमकल्याखेरीज राहत नाहीं. परमेश्वरानं मला योग्य वेळीं योग्य धडा दिला! –चिटणीस! बाबांच्या मृत्यूची बातमी सकाळपर्यंत अशीच गुप्त असूं द्या.

( पडदा पडतो. )

---

# प्रवेश दुसरा.



## स्थळ—रान.

[ हिकमत व सुभान्या तोहमत यास बांधून आणतात. ]

**हिक०** हं! तोहमतराव. उचला पाय लौकर. का काढूं आसुडाचा वार?

**तोह०** नको–नको–नको! मी तुमच्या पायां पडतों. मला आतां मारूं नका. मी जलद चालतों. तुमच्यापुढं पळतों हवं तर.

**सुभा०** व्हयका? मंग पळ बघूं. पन साधा पळूं नगस, जरा घोड्यावानी चौक टाक. न्हाईतर जरा रिंगण धर माज्याभोंवतीं. हं, कडकलक्ष्मी! उडव आसूड या घोड्याच्या पाठीवर.

**तोह०** नको नको–आसूड उडवूं नका–मी तुम्ही सांगाल तसं करतों.

**हिक०** काय! आम्ही सांगूं तसं करतां?

**तोह०** होय, करतों.

**सुभा०** मंग जरा कुत्र्यावानी जरा भू भू कर बरं, न्हाईतर मांजरावानी म्यॉंव म्यॉंव कर.

**हिक०** नको तसं नको. हें रान आहे. रानांत गांवांतल्या जनावराचे खेळ नकोत. यांना आपण रानांतलंच जनावर करूं. तोहमतराव! जरा माकडासारखी उडी मारा पाहूं. [ काठी आडवी धरून ] हं, मारा या काठीवरून उडी. [ तोहमत उडी मारतो. ] आतां ही काठी खांद्यावर घेऊन पाय फेंगडे करून माकडासारखे चाला, हं चाला. [ तोहमत तसें करतो. ] हा खेळ ठीक

असला. माकडाच्या योनींतून आतांच तुम्हीं मनुष्ययोनींत आलां असलं पाहिजे. आतां कोल्ह्याचं काम तुम्हीं कसं करतां पाहूं. हूं ओरडा पाहूं कोल्ह्यासारखें [ तोहमत ओरडतो. ]

सुभा० जरा गाढवासारखं ओरड बघू.

तोह० तें नाहीं मला साधत.

हिक० साधत नाहीं म्हणजे ? साधलं पाहिजे. हा बघा आसूड !

[ आसूड उडवतो. ]

तोह० अरे बापरे ! ओरडतों हो मी ! [ गाढवासारखें ओरडतो ! ]

हिक० हेंही काम चांगलं झालं. हेराच्या धंद्यांतही हीं सोंगं तुम्हाला चांगलीं साधत होतीं तर मग ! हें तुमचं गाढवाचं काम कसं अगदीं स्वाभाविक झालं.

तोह० पण मला सोडा हो. मी तुमच्या पायां पडतों. हें पहा नाक घांसतों. हे पहा कान उपटून घेऊन थोबाडींत मारून घेतों. तुम्ही पाहिजे तर मला चार चार लाथा मारा; पण मला असा बांधून नेऊं नका. मला सोडून द्या.

हिक० सोडून द्या. अरे बाबा ! तुला सोडून कसं चालेल ? जगदेवरावांना बांधून ठेवायला कांहीं वाटलं नाहीं ? अरे हरामखोरा ! हेच धंदे करतोस वाटतं. आतांपर्यंत किल्लेदारसाहेबांकडे खोटीं पत्रं लिहून किती निरपराधी लोकांना छळलं असशील ! कित्येक लोकांचे गळे कापायला कारणीभूत झाला असशील ?

तोह० खरं हो खरं ! आतां मला सगळं आठवतं हो. किल्लेदारसाहेबांनी माझ्याकडून असलींच कामं करून घेतलीं हो. पण मला आतां पश्चात्ताप होतो आहे हो.

हिक० तेव्हां कसं वाटलं ? यी देखा लेकीन बडगा नही देखा ! चल महाराजांच्या समोर आणि कर कबूल सगळ्या गोष्टी ! किल्लेदारसाहेबांची सगळी कूळकथा वाचली पाहिजे. आहे कबूल ? कां उडवूं आसूड ?

तोह० सगळं-सगळं सांगेन. पण मला वांचवा.

सुभा० अस्वलावाची माझ्या सरकारास्नी मारीत व्हता चोर ! पन

तुझ्या नाकांत एषण टवून तुला दारोदार हिंडवून तुजा तमाशा दावतो समयास्नी. हं ही घे काठी तोंडांत. [ तोहमत काठी तोंडांत घेतो. ]

**हिक॰** हं आतां नाच आस्वलासारखा. नाच ! चल आतां चारपायांवर हो. [ तोहमत तसें करतो. ] चल आतां चालूं लाग. हं, सुभानराव ! बसा आस्वलाच्या पाठीवर.

**तोह॰** नको हो नको. मी पाहिजे तर असा चार पायांवर येतों तुमच्याबरोबर; पण मला आतां मारूं नका. माझी पाठ अगदीं सोलवटून गेली हो

**सुभा॰** मंग चाल आस्वलावानी किल्ल्यापावतर.

**हिक॰** उपद्व्यापी हेरांना असंच वागवलं पाहिजे. हं, चला आस्वलसाहेब ! चला लौकर.

[ जातात ]

# प्रवेश तिसरा.

**स्थळ**—टकमकीचा कडा. एका बाजूस भिंताड व त्यांत एक दरवाजा.

[ यमाजी व शिपाई जयवंतरावांस धरून आणतात. ]

**यमा॰** खेंचा त्या हरामखोराला पुढं ! ओलीस रहायला पाहिजे नाहीं ?

**जय॰** मग ओलीस राहणं गुन्हा आहे कीं काय ?

**यमा॰** हो गुन्हाच आहे. जगदेवरावाबद्दल तूं ओलीस राहिला नसतास तर तुला ही कडेलोटाची शिक्षा कां मिळाली असती ? शत्रूला ओलीस राहणं हा राजद्रोह आहे.

**जय॰** कायदे करण्याचा अखत्यार यमाजीभास्कराकडे असता तर तो राजद्रोह ठरता, पण लोकांच्या नशीबानं आणि तुझ्या स्वतःच्या अकलेनं तुझी त्या जागेवर नेमणूक झाली नाहीं. यमाजी ! मला ओलीस राहण्याबद्दल शिक्षा नाहीं. जगदेवराव मुदतींत आले नाहींत तर शिक्षा आहे.

**यमा॰** त्या खांचाखोंचा मला समजत नाहींत. आणि मला त्या समजून घेण्याची जरूरी नाहीं. तुझा कडेलोट करायचा एवढं मला ठाऊक आहे. चला रे ओढा त्याला पुढं ! न्या त्या टोकावर ! आणि लोटा खालीं !

**जय०** पण ही घाई कां ? अद्याप सूर्योदयाला किती तरी वेळ आ सूर्योदयापर्यंत जगदेवराव सहज येतील.

**यमा०** हो येतील ! आले !–वाट बघा. अहो शहाणे, जगदेव बसला असेल या वेळीं आपल्या बायकोबरोबर रंग करीत. तो कसचा येतो. मला झालं आहे सबंद रात्रभर जाग्रण. हें एवढं कडेलोटाचं काम उरकून टाकून सकाळपर्यंत झोंप घ्यायला मला मोकळं झालं पाहिजे. चलारे आटपा लौकर.

**जय०** पण तुला झोंप घ्यायची असली तर तूं घे झोंप ! पण उगीच माझ्या प्राणावर कां गदा ? जगदेवराव यायला सूर्योदयाची मुदत आहे. तुम्ही आतां माझा कडेलोट केला आणि सूर्योदयाच्या आंत खरोखरीच जगदेवराव आले, तर माझे प्राण निष्कारण जातील ! त्याची वाट काय ? महाराजांच्या कानांवर गेलं तर फार कठीण जाईल !

**यमा०** कठीण कसलं आलं आहे त्यांत ! अगदीं सोपं काम आहे. सकाळचा रोजनामा आतांच लिहून ठेवला म्हणजे झालं ! "सूर्योदयापर्यंत जगदेव आला नाहीं, सबब जयवंतरावांचा कडेलोट केला." ही खालीं सही. बस, एवढं लिहिलं म्हणजे ब्रह्मदेव आला तरी काय व्हायचं आहे ! कितीही तक्रारी झाल्या तरी त्या ऐकतो कोण ! आम्हां सरकारी नोकरांचंच म्हणणं शेवटीं खरं ठरायचं मी नेहमीं असंच करतों. हं चला रे, आटपा.

**जय०** काय हा अन्याय ! देवा ! ऐक ऐक हा कबुली जबाब ! महाराज ! आपल्या कडक शिस्तीला घाब्यावर बसवून असले राक्षसी अम्मलदार मनमानेल त्याप्रमाणं कृती करतात ना ? अरेरे ! अधिकाऱ्यांच्या दोन घटकेच्या झोंपेची किंमत मनुष्याच्या प्राणापेक्षां जास्त असावी ना ?

**यमा०** गप्प बैस. अधिकाऱ्यांच्या उलट बोलायला तुला शरम नाहीं वाटत ? अरे ! तुला शक्य तितक्या लौकर मारण्यांत मला किती आनंद आहे याची तुला कल्पना आहे ? आज तूं मरणारच अशी माझी खात्री होती म्हणून तूं वांचलास, नाहीं तर सबंद दिवसांत साप चावून नाहीं तर दुसरं कांहीं होऊन केव्हांच मेला असतास !

**जय०** पण हरामखोरा ! माझ्यावर तुझा इतका डूक तरी कां ? मी काय तुझं घोडं मारलं आहे ?

यमा० हं असं विचार म्हणजे सांगतों. पण मीं सांगण्यावर थोडंच राहिलं असेल ! मालतीनं केव्हांच सांगितलं असेल.

जय० मालतीनं सांगितलं असेल ? मालतीचा काय संबंध ?

यमा० काय संबंध ? तिच्याचमुळं तर मी ब्रह्मसमंधाचं रूप घेऊन तुझी आहुती घेतों आहें ! तुझ्यावर जर मालतीचं प्रेम नसतं तर तिनं मलाच वरलं असतं !

जय० वाः ! हा खूप सूड आहे ! मालतीचं प्रेम तुझ्यावर नाहीं हा का माझा अपराध ? आणि म्हणून माझा जीव घेण्याची घाई ? पण लक्षांत ठेव, सूर्योदयापूर्वी तूं माझा कडेलोट केलास असं जर महाराजांच्या कानांवर गेलं तर तुझा कडेलोटच होईल.

यमा० तें काहीं मग होवो. पण तूं तर जिवंत राहत नाहींस ना मालतीशीं लग्न करायला ?

जय० मी जरी मेलों, तरी मालती तुझ्याशीं थोडीच लग्न करणार आहे ! ती माझ्या पाठोपाठ आल्यावांचून कधींच राहणार नाहीं. तुझ्यासारख्या [illegible]ाजी, हलकट खुनी माणसाशीं—

यमा० हं गप्प बैस ! करा रे याचा कडेलोट ! ढकला हरामखोराला !

[ मालती येते. ]

माल० हां-हां खबरदार त्यांना ढकलाल तर. मला त्यांची भेट [illegible]यायची आहे.

यमा० भेट घ्यायची आहे म्हणजे ? तूं खूप भेट घेशील ! पण मीं [illegible]ऊं दिली पाहिजे ना ?

माल० तुझी काय थोबडी लागली आहे भेट न घेऊं द्यायची. हा महा[illegible]जांचा हुकूम पाहिलास का ?

यमा० वेड लागलं आहे महाराजांना तुला हुकूम द्यायला. [ हुकूम [illegible]खवते. ] मी नाहीं भेट घेऊं देत. [ डोळे मिटून ] मीं अजून हुकूम [illegible]हिला नाहीं, मीं पहाण्याच्या अगोदर या त्या हरामखोराला लकटून [illegible]हतों कशी भेटतेस ती.

माल० यमाजी ! हा माझ्या हातांत हुकूम आहे. हा वाचल्यावांचून [illegible]र तुम्ही अन्यायानं त्याचा कडेलोट कराल, तर—

**जय०** यमाजी ! मी पुन्हा सांगतों, अद्याप सूर्योदयाला वराच वेळ आहे. तोंपर्यंत जगदेवराव खास येतील ! जगदेवराव अस्सल मनुष्य आहे, तुझ्यासारखा कमअस्सल नाहीं.

**यमा०** मी कमअस्सल काय ? कडेलोट करण्यापूर्वी तुझी जीभ छाटू टाकूं का ? पण थांब. त्याच्या अगोदर तुला एक मजा दाखवतों. मालती इकडे ये मुकाट्यानं आणि दे मला आलिंगन. नाहीं देत ? पुन्हां सांगतो आलिंगन दे–काय ! नाहीं देत ? तिसऱ्यानदां सांगतों, आलिंगन दे–काय नाहीं देत ? मग तुला जबरदस्तीनंच द्यायला लावलं पाहिजे. [ मालतीला धरायला जातो, जयवंतराव लाथ मारतो. यमाजी पडतो. ]

**जय०** हलकटा ! घे आलिंगन. माझ्या लाथेच्या प्रसादानं तुला मिळालेलं हें भूमीचं आलिंगन घट्ट घे, आणि परमेश्वराच्या कृपेनं मला मिळालेलं मालतीच्या गोंडस हातांचं हें गोड आलिंगन डोळे उघडे ठेऊन नीट पहा.

[ मालती व जयवंतराव आलिंगन देतात. ] मालती—

**यमा०** हं हं ! हें कायद्याच्या गैर होतं आहे.

**माल०** नाहीं. अगदीं कायद्याप्रमाणं होतं आहे. महाराजांनीं मला इकडं भेटायचा हुकूम दिला आहे. आणि ही पहा मी अशी त्यांना भेटते.

[ पुन्हा आलिंगन देते. ]

**यमा०** मग भेटा, पण शब्दसुद्धां बोलूं नका. महाराजांनीं भेटायची परवानगी दिलेली आहे, बोलायची नाहीं दिली.

**माल०** बोलूं नका असंही त्यांत लिहिलं नाहीं. आम्ही बोलणार, भेटणार– वाटेल तें करणार ! तुला काय करायचं असेल तें कर.

**यमा०** मी काय करणार ! तुम्ही वाटेल तेंच जर करूं लागला तर–

**माल०** तर काय ! पुढं बोल कीं ?–म्हणजे एकदां सगळ्या मुलींनी लाथा दिल्या होत्या तशा देतें.

**जय०** मालती ! तुला बोलत ठेऊन तो वेळ काढू पहातो आहे; जाऊं दे. त्याच्याकडं लक्ष देऊं नकोस. पण मालती ! तुझी इच्छा पूर्ण झाली असं एकदां तूं आपल्या मुखानं मला सांग म्हणजे मला आनंद आहे. मग मला या कड्यावरून खालीं लोटलं तरी चिंता नाहीं.

**माल०** महाराज ! तुमची कर्तबगारी पाहून मला खरोखरच धन्यता वाटली ! पण माझ्यामुळं आपल्या जिवावर संकट आलं यामुळं मात्र मनाला जें दुःख होतं आहे तें होतं आहे.

**जय०** लाडके ! अशी खिन्न कां होतेस ? जगदेवराव आले नाहींत यामुळं मला बळी जावं लागत आहे म्हणून कष्टी होऊं नकोस. जगदेवरावांना कदाचित् आपल्या प्रिय माणसांचा लोभ तुटला नसेल.

**माल०** महाराज ! जगदेवराव इतके नीच मनुष्य नाहींत. ते माझ्या देखत बायकापोरांना दूर लोटून इकडं यायला निघाले ! आमच्या अगोदर तें केव्हांच यायला पाहिजे होते. कांहीं दगा तर नसेल ना ?

**जय०** मलासुद्धां तसंच वाटतं ! ह्या हरामखोर किल्लेदाराचा आत्तांपर्यंत पत्ता नव्हता ! यानं तर कांहीं घोंटाळा केला नसेल ना !

**यमा०** तुम्ही माझ्याकडं असे रोंखून का रे पाहाता ? खबरदार, असे पहाल तर. तुम्हांला दुसरं काय वाटेल तें करा; पण रोखून बिखून पाहूं नका! हं घटका भरली ! चला आतां दूर व्हा.

**जय०** तुला एवढी घाई कसली लागली हेंच मला समजत नाहीं. मालती ! देवाच्या मनांतून कांहीं तरी अनर्थ घडवायचा आहे. या काळ्या रात्रीं सैतानी मनोवृत्तींना धिंगाणा घालण्याकरितां हा सैतान रंगभूमीची तयारी करतो आहे. हा भयंकर कडा आपल्या आयुष्याची मजल संपली म्हणून मला सांगतो आहे. आणि या तारका जगदेवरावांच्या येण्याबद्दल निराश होऊन माझ्यावर दुःखाश्रु गाळीत आहेत.

**माल०** महाराज ! तसं नव्हे ! ह्या तारका आपण केलेल्या महत्कृत्यानं आनंदीत होऊन चमकून चमकून तो आनंद व्यक्त करीत आहेत, आणि पुढं येणाऱ्या सुखाच्या सूर्याला ओंवाळण्याकरितां त्या जलदीनं भरारी मारीत आहेत. ही टकमक जगदेवरावांच्या स्वागताकरितां आतुर होऊन टकमक पहात नाहीं का ! महाराज ! हा गोंड वायू जगदेवराव येत आहेत म्हणून तुमच्या कानांत सांगत नाहीं का ? ही पूर्वदिशा रक्तवर्णाची मंगलध्वजा फडकावीत नाहीं का ? महाराज ! थोरांचं आगमन सर्वांना आनंद देतं ! मग आपल्या-लाच तें कसं वगळील ?

**जय०** लाडके ! या वेळीं तूं माझ्या जवळ आहेस हें माझं केवढं भाग्य तुझं भाषण नेहमीं आशाजनक असतं. निराशेचा वासही त्याला नसतो या भूमीवर पाय ठेवल्यापासून ही भेसूर सृष्टि किती मधुररूप धारण क लागली आहे ! पहा पहा ! या आकाशसरोवराच्या तीरावर आपण आ आहों, या तारकांचे दाणे आपल्या चिमुकल्या मुठीनं या शुद्ध जलांत तूं फेंक आहेस. हे पहा, सूर्यकिरणाचे मासे आपआपल्या भोंवतालचे दाणे पटाप उचलीत आहेत. पहा पहा ! दाणे संपत चालले ! फेंक पुन्हा दाणे फेंक.

**यमा०** अहो कवि ! हें काव्य आतां पुरे करा. आतां मुळींच वेळ मिळ णार नाहीं. शिपाई हो, या जयवंतरावाला त्या टोंकावर उभे करा. आणि मी 'लोटा' म्हणतांच एकदम कडेलोट करा.

[ जयवंतरावाला टोंकावर उभा करतात. ]

**माल०** ( त्याला मिठी मारून ) मीही आपल्या बरोबर आलें. या कड्याच्या बोहोल्यावर एकरूप होऊन प्रेमाच्या अनंत तत्त्वांचा शोध काढण्या करितां आपण एकदम जाऊं या---

पद २६ वें. राग भैरवी, ताल दादरा.

**एक रूप नाथ होऊं । प्रणय डोहीं आजि तनु सोडुनि देऊं ॥ धृ० ॥**
**शैलशिखर मज शुभ बोहलें भासत। सप्तपदिस प्रेमानें धांवूं ॥१॥**

**जय०** मालती ! दे-दे असंच गाढ आलिंगन दे. गाढ प्रेमाची समाप्ति गाढ सुखांत किंवा गाढ मृत्यूंत होऊं दे.

**यमा०** अरे, त्या पोरीला कुणी तरी ओढा. मालती ! सोड जयवंताला नाहीं तर बघ दोघांनाही ढकलून देईन.

**माल०** खुशाल दे. आम्हांला आनंदच आहे. आम्हीं दोघं बरोबर स्वर्गाला जाऊं.

**जय०** लाडके ! पहा पहा ! हा स्वर्ग पहा. चल चल आपण या स्वर्गा वर उडी घेऊन स्वतंत्र होऊं ! त्या तेजस्वी प्रदेशांत विहार करूं ! स्वर्ग हा स्वैर आत्म्याकरितां आहे ! मृत्युलोक गुलामांकरितां आहे ! अनंत बंधनांनीं जखडलेल्या मानवी योनीकरितां आहे !

**यमा०** अरे, याला वेड लागलं आहे. शिपाई हो ! लोटा. ( शिपाई तो

लोटणार तोंच एकदम जगदेवराव येऊन जयवंतरावाच्या गळ्यांत उडी घेतो व सूर्योदय होतो. ) ( संतापून ) नाहीं, नाहीं ! जयवंतरावांचा कडेलोट केल्यावांचून मी राहणार नाहीं. जगदेवराव, तुम्ही सूर्योदयानंतर आलां आहांत !

**जग०** मी सूर्योदयाबरोबर आलों. हा पहा सूर्यनारायण ! आतांच पूर्व दिशेचा दरवाजा उघडून या आकाश रंगभूमीवर पाऊल ठेवतो आहे.

[ शिवाजी, विश्वास, चंद्रावती येतात. ]

**यमा०** कोण महाराज ! हा जगदेवराव सरकारी कामांत !—

**शिवा०** जरा गप्प बसा, सरकारी कामांत गैरशिस्त वागणाराला शिक्षा करण्याच्याच मी विचारांत आहें.

**जग०** तर मग अगोदर या यमाजीला कैद करा. शिवाजी ! तुला जर स्वराज्याची स्थापना करायची असेल तर असल्या हरामखोरांना अधिकारी तर नेमूं नकोसच; पण असल्या दुष्ट माणसांना जिवंतसुद्धां ठेवूं नकोस.

**यमा०** हो-हो तर. तूं खूप माझ्या जिवावर उठशील ! पण महाराजांनीं ऐकलं पाहिजेना ? महाराजांचा एकनिष्ठ सेवकांवर पूर्ण भरंवसा आहे, समजलास !

**शिवा०** खरोखर ! आमच्या सर्व एकनिष्ठ सेवकांवर आमचा पूर्ण भरंवसाच आहे. पण यमाजी ! जयवंतरावाचा कडेलोट करण्याची एवढी घाई कां झाली होती ? तुमची लग्नघटका का भरली होती ?

**जय०** महाराज ! मालती याच्याशीं लग्न करीत नाहीं म्हणून माझा कडेलोट करून माझी ब्याद दूर करायचा या यमाजीचा विचार होता.

**शिवा०** आणि जगदेवरावाला यायला वेळ लागला म्हणजे जयवंतरावाचा कडेलोट करायला हरकतच नाहीं असं यांना वाटलं.

**जग०** मीं वेळेवर येऊं नये म्हणून या रामोशानं एका साथीदाराकडून माझा घोडा पळवून लावला आणि माझा रस्ता चुकवून एका अडचणीच्या जागीं यानं माझ्यावर हल्ला केला आणि मला झाडाशीं गच्च बांधून अडकवून ठेवलं !

**यमा०** गहजब ! काय हा गहजब ! महाराज ! माझ्यावर हे ह तोहमत घालीत आहेत.

[ हिकमत व सुमान्या तोहमताला घेऊन येतात. ]

हिक० किल्लेदारसाहेब ! तुमच्यावर घालायला हा तोहमतच आणल आहे बरं !

शिवा० काय ? हा प्रकार काय आहे ?

तोह० महाराज ! क्षमा करा. किल्लेदारसाहेबांच्या सांगण्यावरून जगदेवरावांचा घोडा पळवला आणि कुडबुड्या जोशाचं सोंग घेऊन रस्ता चुकवला. पुढं किल्लेदारसाहेबांनीं त्यांच्यावर हल्ला करून त्यांना ठेवलं आणि मला पहाऱ्यावर ठेवून ते निघून गेले. पण इतक्यांत हा कलक्ष्मी आणि हा सुमान्या येऊन त्यांनीं जगदेवरावांना सोडवून माझी अवस्था केली.

शिवा० अरे हरामखोरा ! शिपाई हो ! या निमकहराम यमाजी स्कराचा आत्तांच्या आत्तां कडेलोट करा.

हिक० पण सरकार ! अगोदर या किल्लेदाराचीं बरींच नीचकृत्यं म उघडकीला आणायचीं आहेत. तोंपर्यंत याचा कडेलोट करूं नका. मी महा राजांच्या पदराचा हेर आहें. [ वेष काढून ] माझी किल्लेदारसाहेबांवर पहिल्या पासूनच नजर आहे.

शिवा० ठीक आहे. तुमच्या कर्तबगारीबद्दल तुम्हांला बढती व योग्य इना महीं मिळेल ! या हरामखोराचा कडेलोट करायचा हें तर ठरलंच, पण याच्या सर्व गुन्ह्यांची चौकशी करून नंतर तो करूं. त्याला आणि या त्याच्या साथी दाराला तुर्त तुरुंगांत ठेवून द्या.

[ यमाजीला व तोहमताला शिपाई घेऊन जातात. ]

चंद्रा० महाराज ! आतां इकडची सुटका ?

शिवा० होय. तीच गोष्ट मी आतां पहातों आहें. जगदेवराव ! आतां पर्यंत मीं स्वाऱ्या करून तुमच्या जहागिरीपैकीं जेवढा मुलूख काबीज केला आहे तो सर्व या विश्वासाला देऊन त्याला आमचा सरदार आम्हीं करींत आहोंत.

विश्वा० पण बाबांनीं सांगितल्यावांचून मी तुमचा सरदार नाहीं व्हायचा ! बाबा ! मी यांचा सरदार होऊं ?

जग० हो तूं बेलाशक हो. तूं विजापूरकराचा ओशाळा नाहींस,

मला मात्र विजापूरकराशीं बेमान होऊन शिवाजींच्या पक्षाला मिळतां येत नाहीं.

**शिवा०** पण माझ्या पक्षाला मिळण्याचं तुम्हीं कबूल केल्यावांचून मला तुमची सुटका करतां येत नाहीं.

**जग०** सुटका न होतां मला जन्मभर अंधारकोठडीची हवा खात रहावं लागलं तरी माझ्या अन्नदात्याविरुद्ध तरवार उचलायचं मी कधींच कबूल करणार नाहीं.

**शिवा०** पण तुम्हीं आमच्या पक्षांत आलां तर तुम्हांला विजापूरकराविरुद्ध तरवार उचललीच पाहिजे असं नाहीं. मोंगलावर स्वाऱ्या करून तुम्हीं स्वराज्याचा विस्तार करा.

**जग०** तर मग मला अगोदर असं वचन द्या कीं मी विजापूरची पातशाही कायम राखीन आणि मला विजापूरच्या विरुद्ध स्वारीवर पाठविणार नाहीं.

**शिवा०** कबूल. हें घ्या वचन. विजापूरच्या बादशाहीला धक्का लावणार नाहीं, असं मीं बाबांना अगोदरच वचन दिलेलं आहे; तसंच वचन आज मी तुम्हांला देतों. मग तर तुम्हीं आमचे दोस्त होतां ना ?

**जग०** दोस्त कां ? मी तुमचा बंदा नोकर व्हायला तयार आहें !

[ गुडघे टेकून मुजुरा करतो. ]

**शिवा०** जगदंबा तुम्हाला सुखी राखो.

**जग०** जयवंतराव ! आज हा आनंदाचा दिवस तुमच्यामुळं दिसला. मी तुमचे उपकार कसे फेडूं ?

**जय०** यांत माझे मुळींच उपकार नाहींत. ज्या देवतेनं मला हें करण्याची स्फूर्ति दिली, तिचे उपकार माना.

**जग०** ती देवता कोण ?

**जय०** ही मालती !

**माल०** उगीच कांहीं तरी !

**शिवा०**—मालती जयवंतांनीं एकमेकांना अर्पण करून घेतलचं आहे. एकमेकांच्या हृदयांवर एकमेकांची सत्ता चालूच आहे. आतां तीच सत्ता देहावर चालण्याकरितां त्यांची शरीरं सुमुहूर्तावर आपण एक करूं म्हणजे झालं !—बाळ जास ! तुझे बाबा तुला मिळाले ना ?

**विश्वा०** पण महाराज ! आपले बाबा मात्र आपल्याला सोडून गेले !

**जग० जय०** म्हणजे—

**शिवा०** शहाजीराजे कैलासवासी झाले ! हें चंद्रग्रहण मला स्वतःला दुःखदायक असलं तरी तें स्वराज्याला लाभदायक झालं आहे. परमेश्वरा ! हा लाभ आम्हांला निरंतरचा लाभूं दे !

## भरतवाक्य.

### पद २७ वें राग सोहनी. ताल त्रिवट.

**अविरत शिव जगता । सुखविता धरि समता करि ममता प्रतिहता ॥ ध्रु० ॥ सुजल सुफल अवनि करुनि । विमल विभव विजय भुवनीं । नरवर सकला प्रभो दे शंभो वात करी कृपा महागुणा धरा गो जनता ॥ १ ॥**

( पडदा पडतो )



